


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

# दीपावली



☆ गांधी जन्म शताब्दी विशेषांक ☆

ऑगस्ट १९६९ * वर्ष २५ वे * मूल्य २ रु.

## श्रेयनामावली



❊ मासिक व्यंगचित्रमाला ❊

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay–4.






# ज्योतीने तेजाची आरती

हिमालय खडा आहे म्हणून सह्याद्रि, विन्ध्याद्रि उभे आहेत. गौरीशंकर स्थिर आणि स्थित आहेत म्हणून गावोगावचे विठोबा आणि बाळकृष्ण, शंकर आणि अंबाबाई आपापल्या भक्तांचे रंजन आणि सांत्वन करण्यासाठी स्थिरपणे उभे ठाकले आहेत. त्याचप्रमाणे वटवृक्षासारख्या प्रचंड व्यक्तित्वाची व गुणधर्माची माणसे जगात सतत होत आली आहेत म्हणूनच जग उतले, मातले तरी उलथले नाही. आगी पेटल्या तरी ज्वालामुखींनी जग गिळले नाही. माणसे संतापाने बेभान होऊन थरथरली आणि त्यांनी अस्त्र व शस्त्रे परजली तरी धरणीकंप झाले नाहीत. वृक्षलतांनी आपापले धर्म गमावले नाहीत. जगातले सारे सुंदर, मंगल, भव्योदात्त घेऊन व लेवूनच मुळी अशी माणसे जन्माला येतात आणि आपल्या वाणी, लेखणी, अस्तित्व व कृतीने येणाऱ्या पिढ्यांना दिलासा व कधीही न खचणारे, पिचणारे ‘दिल्’ देऊन जात असतात. अशा माणसांना कधी ‘संत’ हे बिरुद लाभते, तर कधी सेनापतीचा पोषाख लाभतो. कधी लोकनेत्याच्या काटेरी मुकुटाचे ते धनी होतात तर कधी तत्वज्ञानी, शंकराचार्य म्हणून काळ त्यांचा गौरव करून जातो. कधी ते स्वामी ठरतात तर कधी ‘महात्मे’ म्हणून त्यांचा जयजयकार घुमतो. पण असे हिमालय प्रत्येक युगात, प्रत्येक देशात उभे रहात आले आहेत म्हणूनच आजचे जग खडे आहे. राहणार आहे. त्या त्या युगावर त्या त्या हिमालयाची यशोमुद्रा रेखांकित केली जाणार आहे. मग कुणी तरी कवि म्हणणार आहे:

> खड़ा हिमालय बता रहा हैं। डरो न आंधी पानी में।
> इसीलिये तो दुनिया भर में। हुआ सभीसें बडा हिमालय॥

अशा खड्या आणि बड्या ‘हिमालया’तच ह्या देशाचे नेतृत्व करून गेलेल्या व ‘महात्मा’ ह्या नांवाने गौरविल्या गेलेल्या मोहनदास करमचंद गांधी यांचा समावेश होतो. महात्मा गांधी ही ह्या देशातली एक तशी फाटकी व्यक्ति पण प्रचंड शक्ति होती ही गोष्ट काळाने मान्य केली आहे. लोकमान्य टिळकांच्या अस्तानंतर सुरू झालेले व ३० जानेवारी १९४८ रोजी अचानकपणे झालेल्या हत्येने संपलेले युग ‘गांधी युग’ म्हणूनच ओळखले गेले, जाईल. ते अनभिषिक्त सम्राट म्हणूनच इथे वावरले. खंडप्राय देशातल्या कानाकोपऱ्यात विविध नांवे व विविध रूपे घेऊन स्वराज्याची चळवळ पोहचली. सामूहिक चळवळीचा (मास मुव्हमेंट) एक फार मोठा व नवा वस्तुपाठ त्यांनी घालून दिला. त्यासाठी ह्या देशाची एकूण ‘प्रकृति’ ध्यानी घेऊन व अन्य शक्यतांचा विचार करून त्यानी सामूहिक चळवळीचे एक नवे तंत्र उभे केले. चरखा, सूतकताई, हरिजनोद्धार, खादी भांडारे, हिंदी राष्ट्रभाषा सभा, ग्रामोद्योग, भजन, स्थानिक समस्यांची उकल आणि स्त्री शिक्षण आदि अनक माध्यमातून जन सामान्यापर्यंत एक नवी अस्मिता फुलविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. आणि ‘खेड्यात चला’ ह्या संदेशातून व ‘राष्ट्रीय शिक्षणा’च्या माध्यमातून त्यांनी एक नेतृत्वाची साखळी उत्पन्न केली. कुठलीही चळवळ प्रथम, दुय्यम, तिय्यम प्रतीचे नेतृत्व सतत उपलब्ध होत राहण्यावर व त्या नेतृत्वावर सर्वश्रेष्ठ नेतृत्वाची पकड पक्की राहण्यावर सातत्याने चालू राहू शकते. महात्माजींनी हे साधले त्यामुळे ह्या देशाच्या प्रमुख, कार्यरत संस्थेवरची त्यांची पकड कधी ढिली झाली नाही. शेवटपर्यंत ते नेतृत्व देत राहिले आणि त्यांच्या तत्वज्ञानाचा भयानक पराभव फाळणीमुळे झालेला दिसत असूनही त्यांचे नतृत्व झुगारून देणे वा त्यांचा पराभव करणे काळाला जमले नाही. अनेक स्तरांवर त्यांनी सामूहिक चळवळ नेली. ते आजच्या खुज्या व संकुचिततेच्या आहारी गेलेल्या नेतृत्वापेक्षा उंच होते, अतीत होते. ‘अखिल भारतीय’ होते. गांधीजींनी हिंदीच्या आंदोलनाला स्वराज्यपूर्व काळात ‘स्टेटस’ आणून दिले. आज तिच्या विरुद्ध प्रचंड आंदोलने होऊ शकतात. त्यांनी जे चांगले दिले आहे ते जपणे, वाढविणे, त्याचा जयजयकार करणे हेच आपले काम आहे. त्यांचा ‘जयकार’ करीत त्यांनी निर्माण केलेल्या साऱ्या ‘भारतीय’ पॅटर्नचा विध्वंस करीत सुटणे हा मात्र अधर्म आहे. त्यांच्या स्मृतींची प्रतारणा आहे आणि आत्मवंचनाही आहे. गांधींची काही स्वप्नं त्यांच्या देखतच विरली. काही आम्ही गेल्या वीस वर्षात वितळवून टाकली आणि तरीही आम्ही म्हणतोच आहोत "महात्मा गांधी की जय।" त्यातले जे जे उत्तम ते राहील. राखलेच पाहिजे.

—संपादक




**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.










अनुक्रमणिका




"मोठी माणसे आणि प्रसिद्ध माणसे यांचे ब्रॉंझ आणि संगमरवरी पुतळे बसविण्यात येतात; तथापि दैवी 'चैतन्य' असलेल्या या माणसाने आपल्या हयातीतच लक्षावधी लोकांच्या हृदयमंदिरात स्थान मिळविले. त्यामुळेच अत्यंत अल्प प्रमाणात का होईना, पण आपणा सर्वांमध्ये त्यांच्या चैतन्याचा अंश वास करीत आहे."

—जवाहरलाल नेहरू




—आर्थिक समृद्धीसाठी राष्ट्रीय ट्रस्ट

**इंडियन ऑईल कॉर्पोरेशन लिमिटेड**

# गांधी जन्मशताब्दीची फलश्रुती



गांधीजीसारखा महात्मा भारतात जन्माला यावा हे आपले केवढे महत्‌भाग्य ! सारे जग आपला हेवा करीत असेल ! युगायुगातून असा एखादाच अवतारी पुरुष जन्म घेत असतो. 'जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानी होते तेव्हा तेव्हा धर्माच्या अभ्युत्थानासाठी व साधूंच्या परित्राणासाठी मी जन्म घेतो' असे भगवान श्रीकृष्णांनी गीतेत सांगितले. एकोणिसाव्या शतकात भारत पूर्णपणे परतंत्र बनला. स्वातंत्र्य हा माणसाचा हक्क आणि त्याची प्राप्ती हा धर्म लोप पावत होता म्हणूनच की काय भारतात स्वातंत्र्याच्या पुनरुज्जीवनासाठी गांधीजींनी जन्म घेतला. केवळ जन्मच घेतला नाही तर आणिबाणीच्या काळात भारतीय जनतेचे नेतृत्व स्वीकारून देशाला त्याचे स्वातंत्र्य गांधींनी मिळवून दिले. केवढे हे त्यांचे आपल्यावर उपकार ? त्यांच्या उपकाराच्या ऋणातच आपल्याला कृतकृत्यता मानणे भाग आहे. साधू, संत आणि महात्मे का कुठे उपकाराची फेड अपेक्षितात ? मग फेड करणार कशी ?

भारत स्वतंत्र झाल्यावर आपल्या दुर्दैवाने गांधीजींचा सहवास आणि मार्गदर्शन आपल्याला लाभले नाही. कदाचित भारताला स्वातंत्र्य मिळवून देण्यापुरतेच त्यांचे अवतारकार्य असावे, म्हणून तर 'कालपुरुषाने' त्यांच्यावर अचानक घाला घातला! गांधीजी गेले पण त्यांचे कार्य आणि कीर्ती अमर आहेत. चालू वर्ष हे त्यांचे जन्मशताब्दी वर्ष. साहजिकच या वर्षात आपल्या या नेत्याचे, हितकर्त्याचे आणि मार्गदर्शकाचे पुण्यस्मरण करून, त्यांच्या आचार-विचारांची उजळणी करून कृतार्थ होणे हे आपले कर्तव्य ठरते. ते आम्ही कृतज्ञतापूर्वक पार पाडले का ?

गांधीजींच्या विचारधनाची आपण महती गातो. परंतु त्या विचारांची पारायणे केल्याने आपला कितपत लाभ होईल ? त्यांचा उपदेश आणि संदेश केवळ पारायणासाठी आहे का ? 'बोले तैसा चाले' अशी त्यांची जीवनपद्धती. वस्तुतः गांधीजींचे विचार आत्मसात् करून त्यानुसार

आचरण केल्यानेच व्यक्तीचे व देशाचे कल्याण होणार आहे. हीच त्यांच्या जन्म-शताब्दीची खरी फलश्रुती नव्हे का?

गांधीजींचे विचारधन अमोल आहे! या विचारसंपदेची आपल्याकडून उपेक्षा घडली तर ते महत्पाप ठरेल. श्रद्धाळू पारंपारिक भाषेत बोलायचे नसले तर असे म्हणता येईल की ती एक आपत्ती ठरेल. साधनशुचिता हा त्यांच्या उक्तीतील आणि कृतीमधील सर्वश्रेष्ठ विचार. किंबहुना तो गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचा गाभा होय. त्याचा आधार सत्य. सत्य हे देशकालातीत असते. सत्याची उपासना, सत्याचे पालन हा गांधीजींच्या दृष्टीने पुरुषार्थ आहे. तेच त्यांचे प्राप्तव्य होते. त्यावरूनच सत्याग्रहाची कल्पना स्फुरली. जीवनभर त्यांनी 'सत्याचे प्रयोग' केले. म्हणूनच त्यांनी सद्विचार, सदाचार आणि सद्भावना यांना महत्त्व दिले.

**सर्वश्रेष्ठ सेवाधर्म**

'अहिंसा परमो धर्मः' अशी जरी स्मृतींची शिकवण असली तरी गांधीजींनी आत्मसात् केलेली अहिंसा गौतम बुद्धापासून उचलली होती. अहिंसेच्या जोडीला त्यांनी करुणा अंगिकारली. करुणेमुळेच ते कुष्ट रोग्यांच्या सेवेला सिद्ध झाले. त्यांच्या मते सेवाधर्म हा सर्वश्रेष्ठ होय. त्यामुळेच दरिद्री-नारायणाच्या दुःखाने ते कळवळले. अस्पृश्यतेमुळे द्रवले. तिचे निर्मूलन करण्यासाठी कटिबद्ध झाले. मानवता हेच त्यांचे श्रद्धास्थान होते. 'मानव तेवढा एक' अशी त्यांची दृढ भावना होती. 'नरेच केला हीन किती नर!' हे पाहून त्यांचे हृदय व्यथित झाले. जेथे अन्याय होता, अत्याचार होता तेथे ते धावून गेले. भारताचे नेतृत्वही त्यांनी याच एका व्यथेतून स्वीकारले आणि शेवटी भारताला स्वातंत्र्य मिळवून दिले. काही लोक म्हणतात त्याप्रमाणे कदाचित् परिस्थितीही भारतीय स्वातंत्र्याला कारणीभूत झाली असेल. तथापि, एवढ्यानेच गांधीजींच्या कर्तृत्वाला उणेपणा येत नाही. युद्धाचा, हिंसेचा अवलंब न करता भारत स्वतंत्र झाला. ही घटनाच अपूर्व होती.

**. . . . गांधीजींचे विचार, उपदेश आणि संदेश हे काय केवळ पारायणासाठी आहेत? केवळ त्यांच्या पारायणांमुळे देशाचे हित साधेल का? . . . . . . . . .**

तिचे श्रेय गांधीजींचे हे कसे नाकारता येईल?

याशिवाय गांधीजींनी भारताला अनेक नवे विचार प्रदान केले. स्वावलंबन हा त्यापैकीच एक. इंग्रजांच्या काळात शारीरिक परिश्रमांचे महत्त्व कमी झाले होते. त्यांचे महत्त्व प्रस्थापित करण्याचा गांधीजींनी प्रयत्न केला. आपले काम करण्यात कमीपणा नाही अशी गांधीजींची शिकवण होती. शिक्षणातही हस्तकौशल्य आणि परिश्रम यांचा गांधीजींनी अंतर्भाव केला. नवी मूलोद्योगी शिक्षण पद्धती सुचवली. अशा तऱ्हेने वैयक्तिक, सामाजिक, आर्थिक आणि राजकीय जीवनाविषयीचा एक अभिनव दृष्टिकोण गांधीजींनी दिला. जीवनातील सर्व चांगल्या गोष्टींवर त्यांची श्रद्धा होती. धर्मावरसुद्धा त्यांची श्रद्धा होती. पण त्यांना धर्माच्या नांवाखाली मानवातील विषमता मान्य नव्हती. धर्मातील कर्मकांडाला, पंथद्वेषाला, अंधश्रद्धेला

## प्रा. म. ना. लोही

त्यांचा विरोध होता. त्यांची धर्मकल्पना सर्वसमावेशक आणि उदार होती. तिच्यात जसे उपनिषदांना व भगवद्गीतेला स्थान होते तसेच कुराण आणि बायबल यांनाही स्थान होते. त्यांची ईश्वरावर श्रद्धा होती. अर्थात् त्यांचा ईश्वर म्हणजे ज्ञानदेवांचा विश्वात्मक देव होता. आयुष्याच्या अंतिम क्षणी त्यांच्या तोंडून देवाचे नांवच बाहेर पडले. म्हणजेच गांधीजी हे संतही होते.

**उच्च-नीच काही नेणे भगवंत...**

महात्मा गांधींचे स्वतंत्र भारताविषयी एक स्वप्न होते. अगदी गरीबातल्या गरीबालाही हा माझा देश आहे आणि त्याच्या विकासात माझे सहकार्य राहिले आहे असे वाटले पाहिजे. स्वतंत्र भारतात उच्च-नीच हा भेदभाव नसावा. सर्व धर्मियांनी व प्रांतीयांनी गुण्यागोविंदाने राहावे. सर्वत्र शांतता आणि सुव्यवस्था असावी. स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे स्थान असावे. थोडक्यात ते 'रामराज्य' असावे. ते स्वप्न साकार करण्याची जबाबदारी आपल्यावर येऊन पडली आहे. सत्य आणि अहिंसेचा अंगिकार आणि पुरस्कार भारताने करावा अशी गांधीजींची मनोमन कामना होती. स्वतंत्र भारतात त्यांना शोषण नको होते, भ्रष्टाचार नको होता, धार्मिक संघर्ष नको होता, शासनात लोकांच्या मताला मान हवा होता. सारांश, गांधीजींच्या स्वप्नातील भारत हा खऱ्या अर्थाने स्वायत्त, लोकतंत्री गणराज्य होता. तो तसा आहे का, याचा विचार गांधी जन्मशताब्दीच्या निमित्ताने व्हावयास नको होता का? आपल्या आजच्या शासन पद्धतीत कोणते दोष आहेत, ते कां आहेत व कसे दूर करता येतील यावर प्रगट चिंतन होणे आवश्यक नव्हते का? हे झाले नाही. म्हणजेच गांधी जन्मशताब्दी-उत्सवाची फलनिष्पत्ती काही नाही. त्यातून आपली उत्सवप्रियता तेवढी प्रत्ययाला आली.

वास्तविक शताब्दी-महोत्सवाचा हेतू गांधीजींच्या जीवनाचे व कार्याचे, विचारांचे व आचारांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण करून त्यापासून आपल्या विचार-आचारातील दोष नाहीसे करण्याचा प्रयत्न करणे हाच आहे. मग आपण यापैकी काय केले? गांधीजींच्या नामाचा जयघोष, त्यांच्या व्यक्तिमत्वाविषयी वसणाऱ्या आदराची अभिव्यक्ती आणि त्यांच्या कार्याचे स्मरण एवढ्या गोष्टी आपण केल्या. पण त्यांचा संदेश आणि उपदेश आचरणात आणण्याची धडपड केली नाही. त्यांचे तत्त्वज्ञान व्यक्तिगत, सामाजिक आणि राष्ट्रीय जीवनात आणण्याचा प्रयत्न केला नाही. त्यांची 'साधी राहाणी व उच्च विचारसरणी'ची शिकवण अंगी बाणली नाही. आपल्या नेत्यांनी सत्तेचा हव्यास सोडला का? भ्रष्टाचाराचे निर्मूलन करण्याचा प्रयत्न झाला का? सामाजिक व आर्थिक विषमता दूर झाली का? राष्ट्रीय



अनुक्रमणिका

एकात्मतेची भावना आपल्यात रुजली का ? प्रांताप्रांतातील, पक्षापक्षातील आणि मालक-मजुरातील भांडणे मिटली का ? हे काहीच झाले नाही तर मग गांधी जन्मशताब्दीची फलश्रुती काय ?

## आत्मपरीक्षणाची आवश्यकता

गांधीजींच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने आपण आणि आपल्या पुढाऱ्यांनी अंतर्मुख होऊन आत्मशोधन केले पाहिजे होते. व्यक्तिगत स्वार्थापेक्षा राष्ट्रीय हिताचा विचार आपल्या मनात यावयास हवा होता. अप्रामाणिकपणा जाऊन प्रामाणिकपणा आला पाहिजे होता. मात्र यापैकी काहीच घडले नाही. आपण केवळ स्वतःला गांधीजींचे वारसदार म्हणवतो. परंतु त्यांनी दिलेला वारसा पुढे चालवण्याचा विचारही करीत नाही. राष्ट्राचा अभ्युदय हे आपले साध्य आहे. देशाचे स्वातंत्र्य टिकवून ठेवायचे आहे. त्यासाठी आपल्या वाट्याला आलेले कर्तव्य प्रामाणिकपणे पार पाडले पाहिजे. गांधीजींना अभिप्रेत असणाऱ्या साधनशुचितेला तर आपण हरताळ फासला आहे. स्वतंत्र भारतात श्रीमंत अधिक श्रीमंत होत आहेत आणि गरीब अधिक गरीब होत आहेत. असाच भारत महात्माजींना हवा होता का ? निश्चितच नाही ! मग त्यांना हवा असलेला भारत निर्माण करण्यासाठी आपण त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त कोणता संकल्प सोडला ? कोणता प्रयत्न आरंभला ?

गांधी जन्मशताब्दीपासून आम्ही कोणती प्रेरणा घेतली ? आमच्या आचार-विचारात कोणता बदल घडवून आणला ? कोणती देशभक्ती अंगी बाणली ? देशभक्ती आणि देशसेवा का सत्ता हस्तगत करूनच करता येते ? आज देशात लोक प्रतिनिधींचे राज्य आहे. स्वराज्य असले तरी सुराज्य आहे का ? ते आणण्याचा आम्ही चंग बांधला आहे का ? राष्ट्राची धुरा आमच्या खांद्यावर आली. ती वाहताना संयम, संतुलन यांची आवश्यकता आहे. स्वार्थत्यागाची गरज आहे. उलट आज आपण भोगलोलुप बनलो आहोत. तिचा त्याग करायला आम्ही तयार नाही. करुणा, दया हे शब्द आम्ही कोशात बंदिस्त करून ठेवले आहेत. तरीही गांधीजी आमचे आराध्य आहेत असे आम्ही अभिमानाने सांगतो. हे सांगताना यत्किंचिही कचरत नाही. गांधीजींच्या कोणत्या मार्गावरून आपण चालतो. त्यांचा कोणता आदेश पाळतो ?

आमचे परावलंबित्व कायमच आहे. दुसऱ्या देशांच्या मदतीवर आम्ही आमच्या प्रगतीचे मजले उभारतो आहोत. नव्हे, त्यांच्या मदतीवरच आम्ही जगतो आहोत. तरीही ऋण काढून सण करताना आम्हाला खंत वाटत नाही की खेद होत नाही. यातून मार्ग शोधण्याचा निश्चय तरी आम्ही या वर्षी केला आहे का ? मग गांधी जन्मशताब्दीची फलश्रुती काय ?

विचार करून मेंदू शिणतो; पण या प्रश्नाचे उत्तर सापडत नाही. फलाशारहित कर्म, केवळ उपचार म्हणून आम्ही हा गांधी जन्मशताब्दीचा सोहळा केला का ? तसे असल्यास त्यातून फलनिष्पत्ती शोधणे [मूर्खपणाचे] ठरेल. वस्तुस्थिती तशी नाही. ज्यातून काहीच निष्पन्न होत नाही अशी कामे करावयास राष्ट्राजवळ वेळ नाही आणि पैसाही नाही. औपचारिकपणे गांधी जन्मशताब्दी करणे म्हणजे त्या महात्म्याशी प्रतारणा करणेच होय !

• • •

....लोकशाहीत राजकारणाचाही व्यापार होत असतो, त्यामुळेच वृत्तपत्र व्यवसाय हा राजकारणाचा उद्योग झालेला आहे. लोकांना हे समजले तरी उमज कशी पडावी ?




लोकशाहीच्या राजकारणात प्रचारास जबरदस्त महत्त्व प्राप्त झाले आहे. प्रचार म्हटला की सत्याचा बळी हा ठरलेलाच. कारण प्रचार म्हणजे सेल्समनशिप. एखाद्या विक्रेत्याने आमचा माल टाकाऊ व रद्दी आहे असे सांगितले तर त्यास गिऱ्हाईक कोण मिळणार? आजकालच्या मतांच्या राजकारणात प्रत्येक राजकारणी पुरुष स्वतः उत्तम सेल्समन् असावा लागतो. त्यास हे सेल्समनशिपचे ज्ञान अवगत नसले तर त्याचा 'साने गुरुजी' होतो.

प्रचारात असत्य बेधडकपणे ठोकून देता आले पाहिजे. कागदावर तुम्ही एकदा का लिहिले की तो पुरावा म्हणून पुढेमागे तुम्हालाच त्रास देतो. बोललेले शब्द त्यामानाने पुष्कळ सुरक्षित असतात. "मी बोललोच नव्हतो" येथपासून "माझ्या विधानांचे विकृतीकरण केले गेले आहे" यापर्यंत काहीही सबब पुढे ढकलली तर चालते. "गैरसमजूत" हा तर विसाव्या शतकातील फार महान् शब्द आहे. सोशालिझम्, अहिंसा, क्रांती, अस्मिता, उत्क्रांती वगैरे आधुनिक शब्दांप्रमाणे राजकारणात "गैरसमजूत" हा शब्द वगळा की सारे वातावरण अंधारमय दिसू लागते. "आपली गैरसमजूत झाली, मी म्हणालो होतो त्याचा अर्थ अगदी वेगळा होता" असे सांगितले की कोणच्याही राजकारणी पुरुषास शंभर गुन्हे माफ!

समस्त गांधीवाद हा प्रचारतंत्राचे उत्तम उदाहरण आहे. गांधीजी जन्माने गुजराती वनिया होते. वनियास जात्याच मनुष्यस्वभावाचे उत्तम ज्ञान अवगत असते. गांधीजींच्या उत्कर्षाचा हा मुख्य पाया होता. गांधीवादात अशा कैक परस्परविरोधी गंमतीदार चिजा दाखवून देता येतील. मात्र गांधीजी व त्यांचे खास "वर्धा-ट्रेण्ड" भक्त यांनी उत्कृष्ट प्रचाराच्या धूमधडाक्यात ह्या परस्परविरोधी विसंगतीना दाबून टाकले व 'गांधीवाद हीच त्या काळाची सर्वात महान् गरज आहे' असे सर्वसामान्य जनतेस व भल्याभल्या सुशिक्षितांना पटवून दिले.

गांधीजी म्हणूनच वास्तववादाकडे कधीही वळले नाहीत. त्यांचा मुख्य भर श्रद्धावादावरच होता. स्वा. सावरकरांचा भर श्रद्धेवर नसून वास्तवतेवर होता. जीवनात श्रद्धेस फार मोठे स्थान आहे. असाध्य रोगदेखील श्रद्धेने बरे होतात. प्रत्येक ठिकाणी वास्तव दृष्टीकोनातून केलेली चिकित्सा खरी ठरतेच असे नाही. सावरकरांचा वास्तववाद, एम. एन. रॉयसाहेबांचा रॅशनॅलीझम्, डॉ. लोहिया यांचा प्रॅग्मॅटीझम् या साऱ्यांचा प्रसार गांधीवादाप्रमाणे होऊ शकला नाही. याचे कारण प्रचारात श्रद्धेस आवाहन असले तरच प्रचार यशस्वी ठरतो. गांधीजी श्रद्धा निर्माण करण्यात अतिकुशल होते.

– दादूमिया

गांधीजींच्या आयुष्याच्या संध्याकाळी त्यांचे राजकीय महत्त्व अगदी कमी झाले होते. त्यांचे पांडित्य कोणीही ऐकून घेण्यास तयार नव्हते. गांधीजी "साधू" आहेत, आम्ही आपली साधी माणसे, असा काँग्रेसमध्ये बोलण्याचा एकंदर सूर ऐकू येई. त्याचा अर्थ काय? "साधू" पदवी दिली की एकदाचे आपण सुटलो अशी भावना मोठ्या व छोट्या काँग्रेस पुढाऱ्यांची झाली होती. आपल्या स्वार्थाच्या आड गांधीजी येत असतील तर ते त्यांना मानवत नव्हते. गांधीजी पराभूत झाल्यासारखे १५ ऑगस्ट १९४७ च्या दिवशी दूर बंगाल-बिहारमध्ये विषण्ण परिस्थितीत फिरत होते.

त्यांच्या नौखालीच्या यात्रेत त्यांना अतिशय मनस्ताप सहन करावा लागला. मनावरचा ताण कमी करण्यासाठी वैद्यकीय दृष्ट्या शरीरसुख हा उत्तम उपाय ठरतो. महात्माजींनी नौखालीत 'ब्रह्मचर्याचे प्रयोग' सुरू केले त्यामागे कदाचित् हेच कारण असावे. सर्वत्र शिव्याशाप, हिंसा व नालस्ती महात्माजींना ऐकून घ्यावी लागत होती. लोकांचे चूक नव्हते. "माझ्या मृत देहावरच पाकिस्तान दिले जाईल" असे गांधीजीच बोलून बसले होते. गांधीजी दुटप्पी बोलतात व वागतात असा लोकांनी आरोप केला तर त्यात आश्चर्य नव्हते.

अशा तंग परिस्थितीत गांधीजींनी सायंकाळी प्रार्थनासमयी काहीतरी बोलावे असा आंधळा आग्रह त्यांचे भक्त करीत. इकडे जातीयवादाचे भूत धुडगूस घालीत असताना गांधीजी "एकाने गाय मारली तरी आपण वासरू मारू नये" असा सात्विक उपदेश करीत असत. अर्थात् तो त्या वेळच्या परिस्थितीस विसंगत असल्यामुळे कोणी विशेष गांधीजींच्या सायं-प्रार्थनेस जमत नसे. कोणी आलेच तर दगड मारण्यास किंवा मांजराचे आवाज काढून सभा बंद पाडण्यासाठी. अशी परिस्थिती असतानाही हिंदुस्थान टाईम्सचा वार्ताहर कॉलम भरभरून सायंप्रार्थनेस एवढी गर्दी जमली, अमुक पुढारी आज प्रार्थनेस हजर होता. आज प्रार्थनेनंतर गांधीजींनी असे सांगितले वगैरे मजकूर दिल्लीस 'आँखो देखा हाल' म्हणून धाडीत असे. त्याच्या मजकुरावर अवलंबून असलेले इतर वार्ताहर स्वतःचा मसाला त्यात मिसळून त्यांच्या वर्तमानपत्रातून "गांधीजींचा यशस्वी दौरा" या विषयावर सविस्तर लिहीत. ह्या वार्ताहराबरोबर एक मराठी ख्यातनाम साहित्यिक रहात. एकदा त्यांनी त्या वार्ताहरास विचारले, "का रे, किती बंडलबाजी करशील?" त्या बंगाली बाबूने तावडतोब उत्तर दिले, "मित्रा, माझी हिंदुस्थान टाईम्समधील लठ्ठ पगाराची नोकरी त्यावर तर








अनुक्रमणिका



## शान्तिदूत

**देवाहुनीही या देशाचा नेता थोर जगात**
**राष्ट्रपित्याचे शतसंवत्सर झळकतसे दिनरात.**
**देशासाठी देशोधडी निज फेकुनिया प्राणा**
**आधी केले मग सांगितले, आचरुनी बाणा**
**परपीडा अपुली मानिली वैष्णवांची जात.**
**देशप्रीतिचा धडा शिकविला फिरवुनिया चरखा**
**दीनपतिता सदा जाहला बन्धु जिवाचा सखा**
**आंधळ्याची काठी होऊनी दिला कुणाला हात.**
**सूर्यप्रकाशासम सत्याची सदा धरूनिया कास**
**धर्मपुत्र हा एक अहिंसाधर्म शिकवी जगतास**
**शान्तिदूत हा जाय अखेरी रामनाम ते गात.**

**– गंगाधर महांबरे**

अवलंबून आहे!" हा मराठी ख्यातनाम साहित्यिक मला सांगत होता, "आणि याच जुन्या पेपरांच्या कटींगवर गांधीजींची अधिकृत बायोग्राफी लिहिली गेली!"

### वृत्तपत्री प्रचार

असाच अनुभव सुप्रसिद्ध वार्ताहरीण ताया झिन्कीन् हिला १९५७ साली मुंबईत आला. पोलिसांनी आपल्या बंदुकांतून खास डम्‌डम् गोळ्या वापरल्या होत्या, लिमलेटच्या नव्हे. त्यांनी माणसे मारली न गेली तरच नवल. पाखरांप्रमाणे गर्दीतील निष्पाप माणसे टपटप मरुन पडत असताना टाईम्स किंवा एक्सप्रेसचे वार्ताहर मृतांचा आकडा आठ किंवा नऊ असे प्रसिद्ध करीत. तायाबाईंनी त्यांना एवढे धडधडीत खोटे अहवाल प्रसिद्ध करण्याचे कारण विचारले. मख्खपणे त्या देशी वार्ताहरांनी उत्तर दिले, "बाई, तुमचे ठीक आहे हो; उद्या काही कमीजास्त झाले तर तुम्ही इंग्लंडमध्ये निघून जाल. पण आम्ही अशा परिस्थितीत कोठे जावे?"

राजकारणी पुरुष म्हणूनच वार्ताहरांना शक्य तेवढे खूष ठेवतात. काकासाहेब गाडगीळांबरोबर दोन तीन वार्ताहर सदैव असत. त्यांना चहाचिवडा देण्यात काकूंची अर्धी शक्ती वाया जात असेल. काका सारे राजकारण माझ्यापासून उगम पावले, अशा थाटात बोलत. कांग्रेस ग्रामपंचायत योजना असो, अशोकस्तंभावरील सिंह असो, खडकवासल्याची एन्. डी. ए. असो नाहीतर सोरटी-सोमनाथाचे पुनरुज्जीवन असो, साऱ्या घटनांचे श्रेय काकासाहेब स्वतःकडे घेत. एन. डी. ए. बाबतीत मात्र नागपूरच्या डॉ. ना. भा. खरे यांनी काकांची चांगलीच फजिती केली. तेव्हा काकांना "काका, या गडबडीत खरी गोष्ट कोणची?" असे मी विचारताच काका म्हणाले, "अहो, त्या वेडचाच्या नादी कोण लागणार? एवढा वेळ आहे कोणाला?"

राजकारणी पुरुष सत्तेवर असतात तोपर्यंत हे वार्ताहर तोंड बंद ठेवतात. म्हणजे, तोंड बंद ठेवावेच लागते. त्याच्या उत्कर्षाच्या काळात "हे कसे बोलायचे?" अशी भीड साहजिकच वार्ताहरांना पडते. अशा वेळी लोकशाहीतील निवडणुका फार 'उपयोगी' ठरतात. आपण प्रत्यक्ष बोललो नाही तरी दुसऱ्या विरोधी पक्षाच्या वार्ताहरास काही सुरस व चटकदार गोष्टी सहज सांगता येतात. एकदा 'वत्ती' लागली की मोठा स्फोट होण्यास किती वेळ?

अशा स्फोटक परिस्थितीत तोंड बंद ठेवणे हा खरा मार्ग ठरतो. सध्याच्या राजकारणातील एका अग्रेसर पुढाऱ्याच्या आचार्य अत्रे ४ वर्षापूर्वी हात धुऊन मागे लागले होते. ह्या पुढाऱ्यांना मी साळसूदपणे विचारले, "आचार्य अत्र्यांवर आपण खटला कां भरत नाही?" त्यांनी तो विषय प्रथम टाळायचा प्रयत्न केला. माझा फारच आग्रह झाला म्हणून त्यांनी त्यांचे तत्त्वज्ञान सांगितले, "आपण खटला भरला म्हणजे माकडाच्या हातात कोलीत देण्यासारखे होते. ह्या लोकांच्या हातात नेहमी काहीतरी चटकदार मसाला तयार असतोच. उगीच कारण नसताना खाजवून खरूज कोण काढतो?" या पुढाऱ्याचे म्हणणे खरे आहे. यशस्वी संपादक तिखटमीठ लावून नसल्याचे असते व असल्याचे नसते करतात व त्यात पुढाऱ्याची फार मोठी बदनामी होण्याचा संभव असतो.

मी अमुक पाहिले, मला अमक्या पुढाऱ्याने असे सांगितले असे मातब्बर संपादक लिहून मोकळे होतात. छापून आले आहे त्याअर्थी ते खरे असावे अशी जनतेची भोळी समजूत असते. "जनतेची वाणी" किंवा "जनमत" हा एकंदर भयंकर प्रकार असतो. जनतेची वाणी याचा अर्थ संधी मिळालेल्या उत्साही लोकांची मते! याच लोकांना लोकशाहीत 'जनतेचे प्रतिनिधी' म्हणतात! आणि सर्वात कळस म्हणजे ह्या पत्रांचे "एडिटींग" होते व खऱ्या पत्रातील मजकूर व प्रसिद्ध झालेला मजकूर यांच्यात पुष्कळ वेळा जमीन-अस्मानाचे अंतर असते. कोईराला पदच्युत झाले तेव्हाची गोष्ट. आँखो देखा हाल म्हणून "Nepali Facts" नांवाचे पत्र माझ्या नेपाळी मित्राने 'लिंक'कडे धाडले. 'लिंक'ने ते जसेच्या तसे प्रसिद्ध केले.

[पृष्ठ ६५ वर]

# “नाश्त्याबरोबर मी नेहमी तांबं खातो !”



शिवाय लोह, कॅल्शियम अन् आयोडिन खातो ते वेगळंच. खरं तर हे सदगृहस्थ ८ महत्त्वाची खनिज द्रव्ये अन् ११ अत्यावश्यक जीवनसत्त्वे घेत असतात. निरोगी जीवनाला अपरिहार्य असलेली ही सारी द्रव्ये व्हिमग्रॅनच्या अवघ्या एका टॅबलेटमध्ये सामावलेली असतात. नुसतेच आरोग्य नाही तर उत्साह अन् प्रखर रोगप्रतिबंधक शक्ति यांसाठी आवश्यक असणारी सारी जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये व्हिमग्रॅनमध्ये आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर तांबं घ्या. ताज्या रक्ताची निर्मिती अन् कामासाठी लागणारा उत्साह आपल्याला या खनिजामुळे मिळतो. व्हिमग्रॅनमधील इतर जीवनसत्वे व खनिज द्रव्ये नियमित घेतल्याने या सदगृहस्थांची त्वचा अन् दृष्टी अतिशय निरोगी राहिली असून त्यांचे दात अन् हाडेही पूर्वी कधी नव्हती एवढी कणखर आहेत.

# व्हिमग्रॅन®

अनेकविध जीवनसत्वे
व खनिजे असलेल्या टॅबलेटस




® हा रजिस्टर्ड ट्रेडमार्क ई.आर. स्क्विब अँड सन्स यांचा असून तो वापरण्याची अनुमती करमचंद प्रेमचंद प्रा. लि. यानी मिळविली आहे.

व्हिमग्रॅनची अवधी एक टॅबलेट
दिवसासाठी लागणारा
सारा उत्साह मिळवून देते.

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

Shilpi SC 7/69 MAR








# आचार्य अत्रे

## एक दूरचा डोंगर

—रवींद्र पिंगे



स्वतःवर वेनिहाय लुब्ध असलेली ठळक माणसं दोनच. एक पं नेहरू, दुसरे आचार्य अत्रे. नेहरूंप्रमाणेच आचार्यांनाही स्वतःचे वेगवेगळ्या पवित्र्यांमधले आणि अवस्थांमधले फोटो काढून घ्यायचं विलक्षण वेड होतं. स्वतःवर नितांत प्रेम करण्याची त्यांची ती निःसंकोच रीत होती. फोटोसाठी ते दोघेही केव्हाही आणि कुठेही उभे राहिले नाहीत असं झालंच नाही. अत्र्यांची नेहरूंच्याही वर ताण होती. ते आपले हंसरे, हार घातलेले फोटो वृत्तपत्रांमधून कटाक्षाने छापीत, छापवून आणीत. जाहिरातबाजीवर त्यांची उदंड श्रद्धा होती. म्हणून तर एका हातात घणाघाती लेखणी घेतल्यावर दुसऱ्या हातात शंख धरायला ते विसरले नाहीत. काँग्रेसच्या सोयीस्कर डगल्यातले जसे त्यांचे फोटो आहेत, तसेच आंग्ल वेषातले भांग पाडून काढलेलेही आहेत; उघडेबंब फोटो आहेत, नाटकातला डोंबा मारलेले आहेत, पदकांचं भूषण मिरवणारे आहेत. ह्या सर्वात 'अत्रे-उवाच' सदराच्या वेळी 'नवयुगा'त कटाक्षाने छापून येत असलेला, ओठावर लेखणी टेकवलेला गुलजार मोहोऱ्याचा आंखडू फोटो मोठा मारू दिसायचा. आचार्यांचं पहिलं दर्शन आम्हा पोरांना त्या फोटोतच घडलं. फोटोप्रमाणेच त्यांनी आपल्या लपेटीदार अक्षरावरही मनमुराद प्रेम केलं. आपल्या लफ्फेदार स्वाक्षरीचा वळणदार ठसा तर त्यांनी शेकडो लेखांच्या डोक्यावर किंवा तळाला पायावर उमटवून घेतला. त्यांची प्रवाही सही मोठी देखणी होती. "हसा नि जगा" हा त्यांनी त्या राष्ट्रीय मेळ्यांच्या सोवळ्या काळी तमाम पोराटोरांना स्वाक्षरीबद्ध दिलेला मार्मिक संदेश प्रथमदर्शनी अगदी चंट वाटला. भजनाच्या दिंडीत कुणीतरी लावणीचा फर्मास वार हाणावा, तसा वाटला. त्यांचा तो फोटो, ती स्वाक्षरी आणि तो संदेश, आम्हा तमाम शाळकरी पोरांच्या, मिनाक्षीच्या कटाक्षांसारखा अगदी थेट काळजालाच भिडला. त्यांचं 'साष्टांग नमस्कार' तर शाळाकॉलेजांचा हुकमी एक्का. तो काळही अलोट रंगतीचा. मास्तरांचं मुरंब्यासारखं गोड गाणं आणि अत्र्यांचं हसरं नाटक त्या काळात कुठे रंगलं नाही असं घडलंच नाही. अत्रे-घाटे पुस्तकं म्हणजे पोरांचेच नव्हेत तर शिक्षकांचेही दोस्त. ते म्हाताऱ्यांच्याही सभा म्हणे हसवून सोडायचे. तर, असे हे वस्ताद अत्रे दिसतात तरी कसे हे कुतूहल स्वस्थ बसू देईना. आमच्या शाळेतल्या कुळकर्णीसरांनी त्यांच्या 'घरजांवई'मध्ये काम केलं. म्हणून त्यांच्याकडे खडा टाकून पाहिला. त्यांनी स्पष्ट सांगितलं, 'अत्र्यांचं काही खरं नाही. माझे पैसे कुठे मिळाले आहेत ?' अर्थात् त्या निराश बोलण्याचा परिणाम आमच्या-



अनुक्रमणिका

## कै. आचार्य प्र. के. अत्रे यांचा दि. १३ ऑगस्टला बहात्तरावा जन्मदिवस ! त्या निमित्तानं त्यांच्या जीवनपटाचं यथातथ्य दर्शन घडविणारं अदृश्य पैलूंचे रेखाटलेलं हे एक आगळे शब्दचित्र.

वर काडीभरदेखील झाला नाही. अत्र्यांना पाहण्याची तहान वाढतच गेली. आणि अखेर ते दिसले ! पण कसे ? खोताच्या वाडीत भलत्याच जुन्या थाटाची एक पार खिळखिळी झालेली मोटरगाडी घुसवीत असताना ! त्या चॉकलेटी रंगाच्या डुगडुगणाऱ्या रोड गाडीच्या कापडी छताला आचार्यांची टाळू घासटत होती. आचके देत देत गाडी पुढे पुढे सरकत होती. अत्र्यांचं ते पहिलं आखडलेलं दर्शन एकदम विरस करणारं ठरलं. दुसऱ्यांदा दिसले ते बालगंधर्वांच्या नाटकाला एका प्रशस्त कोचावर ऐसपैस पडलेले. पण त्यावेळी नारायणरावांचा विद्रुप स्त्रीपार्ट पाहून आमची मनं इतकी धास्तावलेली होती की अत्रेदर्शनाबद्दल आम्हाला अजिबात उमेद उरली नव्हती. जाता जाता एक गोष्ट मात्र कटाक्षाने जाणवली – अत्र्यांचे फोटो कितीही हसरे असोत, प्रत्यक्षात मात्र त्यांच्या मुद्रेवर एक करुण भाव नियतीने कोरलेला आहे.

### मर्ढेकरांशी मुकाबला

तिसऱ्या वेळी मात्र ते भले एटदार भासले. विल्सन शाळेच्या पटांगणातल्या चिंचेच्या सावलीत नवी कोरी लांबोडकी शेवरोलेट गाडी उभी करून तिच्या बाहेर ते मित्रमंडळींबरोबर गप्पा छाटीत होते. काऊबॉयच्या डोक्यावर असते तशी त्यांच्या डोक्यावर भली मोठी फेल्ट हॅट होती. डॉ. ग्रामोपाध्यांनी तिथे त्यांच्या पुढे सिगरेटचं पाकीट केलं. थंडपणे अत्रे म्हणाले, "थँक्स. मी धूम्रपान कधीही करीत नाही, मला आवडत नाही."

शाळेच्या पटांगणात साहित्य संमेलनाचं कामकाज सुरू झालं. अत्रे श्रोत्यांमध्ये बसले. एका मोठ्या फळ्यावर आकृत्या रेखाटीत कै. मर्ढेकर आपलं सौंदर्यमीमांसेचं गहन प्रमेय मांडू लागले. त्यांचं क्लिष्ट म्हणणं सर्वांच्या डोक्यावरून ढगांसारखं जाऊ लागलं. त्यांची लंपावळही संपेना. श्रोते बापडे हैराण झाले. अत्र्यांनी मात्र हिंमत केली. ते चिडले. सभेत उभं राहून मर्ढेकरांना जाब विचारू लागले. अत्र्यांनी त्रागा केला. मात्र, निळा सर्जचा सूट घातलेल्या रेशमी केसांच्या गोरटेल्या मर्ढेकरकवींनी डोहात पडणाऱ्या चांदण्यासारखं विमल हास्य केलं आणि अत्र्यांकडे पूर्ण दुर्लक्ष केलं. अत्र्यांचा केवळ नाईलाज झाला. त्यांनी चारचौघांत चडफडत नांगी टाकली; पण मनात नवकवींवर अकारण डूख ठेवला, तो मात्र अगदी कालपरवापर्यंत. ओढगस्तीच्या काळात चलती असलेल्या नवकवींबरोबर गावोगाव हिंडून त्यांनी काव्यगायनं ठोकली. पैसे मिळवले. पण मनाचा सांधा साधला नाही तो नाहीच. अखेरी अखेरीस तर नवकवींवर अपशब्दांची अकारण गोफणबाजी करण्यातच त्यांनी बळ खर्चिलं. त्याचा काहीही उपयोग झाला नाही. चार पराभूत साहित्यिकांच्या आणि मजेसाठी सभेला आलेल्या जनताजनार्दनाच्या टाळ्या मिळाल्या. तेवढ्या चाऱ्यावर अत्रे खुशाल झाले.

भारतीय स्वातंत्र्याच्या पहाटकाळी सानेगुरुजी, सेनापती बापट आणि आचार्य अत्रे ह्यांचं मोठं मिष्ट मेनकूट जमलं होतं. गुरुजी मानीत की सेनापतींसारखा देवमाणूस सापडणे नाही. आचार्य गुरुजींना प्रति ज्ञानेश्वर लेखीत. सेनापती उरलेल्या दोघांना हरिस्वरूप म्हणत. पैकी गुरुजींनी तडकाफडकी आत्मघात केला. अत्रे अक्षरशः दुभंगले, गलबलले. तिरीमिरीतच म्हणाले, "मी 'श्यामची आई' पडद्यावर आणतो. मातृप्रेमाचे महन्मंगल स्तोत्र रुपेरी पडद्यावर अमर करतो !" साठे उत्साहाने सावकार झाले. पुढे पस्तावले हा भाग वेगळा. नटी घरचीच होती. अष्टपैलू होती. अष्टावधानी अत्र्यांनी तिच्याकडून बहाद्दर अभिनय करून घेतला. हर्णै, दापोली, लाडघर, हा कंच हिरवा कोकणी भाग टिपून घेतला. शुटींग संपत आलं. अखेरच्या दिवशी चित्रपटातलं सलामीचं दृश्य घ्यायचं ठरलं. कैदी श्याम तुरुंगातल्या कैद्यांना गुडघे मुडपून आत्मकथन ऐकवीत आहे असं दृश्य होतं. विगा ठीक लागल्या होत्या. प्रकाशाचे झोत वरखाली होत होते. कैद्यांचे कपडे घालून एक्स्ट्रा नट पैजांची विवंचना करीत सेटवर विड्या पीत होते. थोरल्या श्यामची भूमिका करणारा मुख्य नट सदानंद जोशी डोंबा फासटून ठिय्या मारून होता. सर्व संच नीट जमला होता. उणीव होती फक्त दिग्दर्शक अत्र्यांची. त्यांची वाट बघ-बघून आम्ही पाहुणे कंटाळलो होतो. रात्र सरत होती. डोळे पेंगत होते. बरं, उघडे ठेवावेत तर समोर कंगाल नटांचे उग्र चेहेरे दिसत. मी तर कोमेजलोच. इतक्यात ताडमाड उंच अत्रे प्रकाशाच्या झोतासारखे सेटवर घुसले. आवाज खणखणायला सुरुवात झाली. एकेकाला फैलावर घेतला. सर्वांच्या झोपा पार पळाल्या. सेटच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत ते धावूपळू लागले. सूचना देऊ लागले. अखेरच्या शॉटसाठी कॅमेरा सुरू झाला. आणि ऐन मोक्याच्या वेळी कुणा तरी एक्स्ट्रा नटाने बराच वेळ तोंडात कोंडून ठेवलेला विडीचा धूर भपकन् बाहेर सोडला ! कॅमेऱ्याने तो टिपला. फिल्म फुकट गेली. अत्र्यांचा पारा चढला. त्यांनी नटांना इरसाल शिव्या घातल्या. आम्ही सारे भेदरून गेलो. हास्याचे कल्लोळ उडवणारा, संतवचनश्रवणाने विरघळणारा आणि मातृप्रेमाचे महन्मंगल स्तोत्र अजरामर करू पाहाणारा हा बलदंड कलावंत लेखक प्रसंगी कफल्लक, दुबळ्या, लाचार एक्स्ट्रा नटाची आयमायही उद्धारू शकतो, हा आम्हाला तरी नवाच शोध होता. पुढे अत्रे म्हणाले, 'एका अत्र्यात बारा अत्रे आहेत !' तेव्हा सर्व उलगडा झाला.

### कफल्लक अवस्थेतही दिलदारपणा

वर्ध्याच्या दिवाणबंधूंपैकी एकाचं मला पत्र आलं की आचार्य विनोबांबद्दल निघणाऱ्या एका खास गौरवग्रंथासाठी आचार्य अत्रे आपला लेख देतील काय पहा. माझ्या आयुष्यातलं स्वयंसेवकगिरीचं आणि अत्र्यांच्या आयुष्यातलं निःस्वार्थ, निर्मम असं तीव्र सामाजिक



अनुक्रमणिका

जाणीवेचं पर्व चालू होतं. मी तडक माहीमची चौपाटी गाठली. 'आपट हाऊस'ची घंटा वाजवल्यावरोवर दार उघडायला तेच उघडेवंब पुढे आले. फक्त एक चोळणा त्यांनी अस्ताव्यस्त फुगलेल्या वेढव छातीपर्यंत ओढून घातलेला होता. मला ते जवळजवळ खेटूनच उभे राहिले. मी भीतीने क्षणभर चेपून निघालो. विनोवांवर लेख लिहून ठेवतो, दोन दिवसांनी येऊन घेऊन जा, असं त्यांनी कार्यवाहुल्याचं खेकट उत्पन्न न करता उत्स्फूर्त आश्वासन दिलं. शंभर चुल्यांवर ह्याने आधण ठेवलेलं असणार, हा गृहस्थ दोन दिवसात कसचा लेख देतो, असं मानून मी चार सहा दिवसांनंतर त्यांना लेखाचं स्मरण द्यायला म्हणून गलो. ते शांतपणे म्हणाले, "मी तुमची वाट पाहिली नि शेवटी स्वतःच लेख वर्ध्याला पाठवून दिला!" मी सर्द झालो. त्या लेखाच्या मोवदल्यापोटी त्यांनी कपर्दिकही मागितली नाही. त्या काळात ते कफल्लक झालेले होते. कफल्लक म्हणजे इतके कफल्लक असत, की रेल्वे फलाटावरले उकडलेले वैदे विकत घ्यायलाही त्यांच्याकडे दिडक्या नसत. त्यांची तलफ भागवायला मित्रांना हात पुढे करावा लागे. विनोवांनी तर त्यांना झपाटलंच होतं. समाजवाद्यांचे ते कैवारी वनले. त्यांच्या विचारसरणीत मूलभूत वदल झाला होता. एकदा म्हणाले, "माझ्या आयुष्याला वळण लावणारा महापुरुष एकच – अच्युतराव पटवर्धन!" लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. त्यांनी अखिल भारतीय पातळीवरल्या सर्वांची रेवडी कधीना कधी उडवली. अपवाद फक्त दोघांचा केला. एक भाई डांगे आणि दुसरे अच्युतराव. पैकी डांग्यांच्या स्तुतीमागे वटवटीत अक्षरात लिहिलेलं विनचूक गणित होतं. अच्युतरावांवद्दलच्या आदरात निवळशंख उमाळा होता. मोवदल्यांचे हिशोव त्यांनी कधी ठेवले, कधी ठेवले नाहीत. रांगणेकरांना 'तो मी नव्हेच!' देताना त्यांनी मोवदल्याची भाषा काढली नाही. अत्र्यांच्या छावणीला रामराम ठोकून स्वतंत्र नाटचसंसार स्थापलेल्या प्रभाकर पणशीकरांना नव्या नाटकाचे विनामोवदला आश्वासन दिले. ग. पां. परचुऱ्याना मोजून पस्तीस पुस्तकं दिली. पैकी एकाचाही करार केला नाही. लेखनाचा तर त्यांना कंटाळाच नव्हता. हरिभाऊ मोटचांनी प्रकाशन केलेल्या पुस्तकाला अत्र्यांनी प्रदीर्घ प्रस्तावना लिहून दिली. निर्भीड आणि मर्मज्ञ हरिभाऊंना गुणवत्तेच्या दृष्टीने ती अत्र्यांच्या नांवाला शोभणारी वाटली नाही. त्यांनी ती अत्र्यांना परत केली. त्यावद्दल मनात डूख न ठेवता आचार्यांनी लागलीच वैठक मारून एक सवाई प्रस्तावना लिहून दिली. ती हरिभाऊंनी संतोषाने स्वीकारली.

एका वाजूने हे असं उमाळयाचं, हिशेव-ठिशेव गुंडाळून ठेवणारं जीवन चाललं होतं आणि दुसऱ्या वाजूने दुनियेचा विपरीत, उफराटा अनुभव येत होता. मनुष्य हा मूलतः मूर्ख, लाचार, भित्रा प्राणी आहे; तो सत्तेला, शक्तीला, संपत्तीला वश आहे; आणि शक्तिमान पृथ्वी भोगेल ही श्रद्धा, हे पुढे पुढे त्यांच्या अवघ्या जीवनाचं सूत्र झालं होतं. लोकांना सोयीस्कर हत्यारासारखं वापरायचं आणि गरज संपली की त्यांना मोडून फेकून द्यायचं असं त्यांचं गेलं तपभर चाललं होतं. एकेकाळी प्र. स. पक्षात त्यांची फार चहा असे. समाजवादी कार्यकर्ते त्यांच्यावर फिदा होते. राजासारखे ते ठाकुरद्वारातल्या पक्षकचेरीत

येत. पण त्यांच्या त्या शतपावल्या फार दिवस टिकल्या नाहीत कारण साथी गोरेंसारखी, दंडवत्यांसारखी माणसं त्यांना वापरता यत ना! ही केवळ 'मम' म्हणणारी विदुषकं नव्हेत हे ताडल्यावरोवर अत्र दुगाण्या झाडीत प्र. स. पक्षापासून दूर झाले. जनतेच्या चळवळीत समितीचं निशाण घेऊन शिरोभागी दाखल झाले. महाराष्ट्राचं भाग्य घडविण्याचा त्यांनी चंग बांधला. गर्दीच्या त्या चढाईत त्यांचा जीव लागला. संयुक्त महाराष्ट्राची न्याय्य चळवळ हा त्यांना साफल्यपूर्तीचा सोपान वाटला. पण त्या विराट पथकातही सामना करायला गोरे हजर होतेच! आणि गोऱ्यांच्या खांद्यावर निष्कलंक चारित्र्याचा तेजस्वी परशु होता! त्यांना समोरासमोर पराभूत करणं अत्र्यांच्या देवांनाही शक्य नव्हतं. म्हणून त्यांची आणि त्यांच्या पक्षाची यथेच्छ टिंगल करण्याचा आचार्यांनी विडा उचलला. हाताजवळचं सोईस्कर हत्यार म्हणून कम्युनिष्टांना वापरलं. त्यातून सत्ता आणि संपत्ती जमली. पण जाणकारांच्या नजरेतून त्यांचा मान जो गेला तो गेलाच. फुटलेलं भिंग कधीही सांधलं नाही. ठाकुरद्वारातल्या ज्या पक्षकचेरीत ते छाती पुढे काढून मानाने यत आणि बहुमानान वावरत, त्याच पक्षकचेरीतून कार्यकर्त्यांनी उडवलेली हुर्यो ऐकत ऐकत मान खाली घालून जळतपोळत जावं लागलं. जाताना त्यांनी त्या कचेरीचा दरवाजा इतक्या जोराने ओढून घेतला की त्या दणक्याने क्षणभर सगळेजण दचकले. पण बाहेर लोकप्रियतेच्या भरतीच्या आक्रमक लाटांवर आरुढ झालेल्या अत्र्यांना लोकप्रीतीचा दरवाजा जो बंद झाला तो झालाच. त्या दरवाज्याच्या बाहेर मात्र ते बिल्लेधारी राजे होते. त्रिखंड फिरत होते. हजारोंना हसवीत होते; झुलवीत होते. मॉस्को, ताष्कंद, लंडन, टोकीयो, असे धावत होते. रकानेच्या रकान एकटाकी लिहीत होते. त्यांच्या आयुष्याच्या यशयात्रेत जयगानाचे नाद निनादीत होते.

## एक आंतरिक खंत

गेली सात आठ वर्ष मात्र अत्रे आंतरिक अपयशाने पिचून गेले होते. त्यांची उमेद मरगळली होती. नांव कमावलं, पैसा उदंड मिळवला, रगड लिहिलं, नाटक कंपनीचे तडाखेबंद खेळ केले, फोटो छापवून आणले, घरदार केलं, गाडीघोडा झाला, वगैरे-वगैरे ठीक आहे. पण मैफलीत आपण समेवरची टाळी मिळवलेली नाही, हे त्यांनी जाणलं. नवे, तरणे लेखक आपल्यावर माया करीत नाहीत; कोल्हटकर-गडकऱ्यांवर आपण स्वतः केली तशी उमाळ्याची भक्ती हे नवे बच्चे आपल्यावर करीत नाहीत; आपल्या पायाजवळ बसून विनोदाचं व्याकरण शिकत नाहीत, ह्याची त्यांना खंत वाटे. अत्यागेल्या लेखकांजवळ ते ती प्रांजळपणे बोलूनही दाखवीत. सर्व लेखकबंधूनी आपली सर्व वैरं आणि खरकटी अरबी सागरात बुडवून दिलजमाईने वागावं, प्रेम पेरावं, असा भाबडा विचार त्यांना अस्तकाळी वारंवार सुचे. पण वरळीचं वळण घ्यायला नव्या दमाचे पहिल्या रांगेतले लेखक तयार नसत. वळलेच, तर मतलबापुरते उभ्या उभ्या वळत आणि पुन्हा सरळ रस्त्यावर येऊन हात पुसून मोकळे होत. हे काय अफलातून कोडं आहे त्यांना उमगेना. तशी



## तेरा जून!

प्रलय – पंढरीचा वारकरी

आज निद्रिस्त झालाय् आपल्या वाहूतल्या प्रलयांसह,
वीजेच्या इतस्ततः शकलांनी घडवलेला अकाळ देह
सज्ज छातीच्या ढालीवर रुळणाऱ्या प्रपाती फुलांच्या माळातून
आमच्या पुढ्यात केव्हातरी फेकलीस हसता हसता एक सर
झेडूंच्या फुलांची काया देऊन
तू हसत हसत केव्हाच पाठमोरा झालास.
चालू लागलास, कित्येकदा अनवाणी
मागे वळून पाहिलेस तेव्हा
दिसली असावी तुला आमची ग्लानी
मुखवट्यांच्या जगावर तू कैफ चढवलास
आमच्याही चेहऱ्यांना थोडा मानवी रंग आणलास!
हसता–हसवता तू पुन्हा पाठमोरा झालास.
चालू लागलास मध्यान्ही, दिशा धुंडाळीत पावलांनी,
वाटेवरचे सारेच कसे तुला आप्त वाटले.
कुणाचा आक्रोश, कुणाचे गाणे, कुणाचा टाहो, कुणाची मरणे,
असे सारेच कुणाकुणाचे..... ते ते तुझे!
सर्वांगांनी कोसळणाऱ्या जीवनाचा ध्वज तू रोमरोम मिरवलास.
प्रलयांच्या लाटा अडवणारी तुझी 'सह्य' छाती
नितांत-निर्भर होती त्यावर आमची अर्ध-शतक माती.
तू चालत राहीलास, अनावर ओढीने.
आताच कुठे तुझ्या पावलांना क्षितिज सामोरे येत होते.
जागी व्हायची होती अजून किती तरी पहाट-स्वप्ने
कोलमडेपर्यंत चालत होतास तू वादळ होऊन प्रचंड वेगाने.
उभ्या जन्मींचा उमाळा दाटून आला उंबरठ्यावर
तेव्हा मऊ झालास विष्णुदासाहून
'जल्दि चलो गाडीवाले!'....
आठवावा देवदास अशावेळी तुला,
..... आता आठव तुझाही आम्हा केवळ गहिंवरून!

-वा. रा. सोनार









नव्या पिढीशी त्यांनी तोंडओळख ठेवली होती. बबन प्रभूने पंधरा वर्षामागे 'जग काय म्हणेल ?' मध्ये केलेली भूमिका अत्र्यांनी पाहिली होती. पंधरा वर्षाचे उन्हाळे पावसाळे वाहून गेल्यानंतर बबनची त्यांची गाठ पडताच त्यांनी बबनला विचारलं, "काय रे, जग काय म्हणतंय ? नि त्यावेळी तू केसांना तेल न लावता रंगभूमीवर कां आला होतास ?" असं त्यांचं स्मरण विलक्षण होतं. नवे लेखक काय करतात ह्याचाही ते कानोसा घेतच. एका नव्या नाटयसंस्थेचं उद्घाटनाचं आमंत्रण द्यायला बबन 'शिवशक्ती'त गेला होता. इतर जुन्या संस्था हयात असताना दुसरी नवी संस्था काढल्याबद्दल आचार्यांनी परखड शब्दात नाराजी व्यक्त केली. पण बबनला हेही सांगण्यास तो रंगभूमीचा कनवाळू सेवक विसरला नाही की, "बबन, तुझा काही मजकूर छापायचा असेल, तर तो खाली प्रेसमध्ये नेऊन दे. 'मराठा'त छापू." 'मात्र नवीन लेखकांचं वाङमय ते चवीने वाचीत नसत. मोठमोठ्या सभा त्यांनी जिंकल्या. तसे ते त्या जन्मभर जिंकीत आले होते. मात्र काही किरकोळ बैठकी कोसळल्यासुद्धा. एका किर्तनकाराच्या टुकार नाटकाचा मुहूर्त अत्र्यांच्या हस्ते अलीकडेच गिरगावात ब्राम्हणसभेत झाला. अत्रे आले पण समारंभाला माणसंच नव्हती. शेवटी चालकांना धावाधाव करून नाक्यावरल्या इराण्याकडे चहा पीत बसलेल्या नाटक्यांच्या एका अलिप्त टोळक्याला पकडून प्रेक्षकांची भूमिका दमदाटी करून द्यावी लागली. दुसरं उदाहरण दामुआण्णा जोशी ह्यांच्या तसबीरीचं अनावरण 'शिवशक्ती'त झालं त्यावेळचं आहे. सर्वांना जाहीर आमंत्रण होतं. पण सभागृहात अत्र्यांकडे नाटकात कामाला असलेली पोटार्थी मंडळीच तेवढी आज्ञाधारकपणे हजर होती. मला वाटतं, बाहेरचा माणूस असा मी फक्त एकटाच होतो ! त्यादिवशी आचार्य विलक्षण रटाळ आणि अनौचित्यकारक बोलले. असे चढउतार चालू होते. लेखकांकडून मिळणाऱ्या जाणकार मान्यतेच्या बाबतीत तर सतत उतारच होते. भाऊ पाध्ये, वसंत बापट, हमीद दलवाई, वगैरे मंडळी लेखक म्हणून त्यांना ढिम जवळ करीनात. बरं, वरच्या स्तरात पु. ल. देशपांडे नांवाचा विनोबाचा धवधवा ऐशा जोसात वाहात होता की त्या प्रतापी धारेत छापवून आणलेले खास कंसातले हसे अणि टाळ्या, कुठच्या कुठे वाहून गेले. पैकी, फक्त पु. ल. देशपांडेचं स्वतःच्या वडीलकीला शोभेसं कौतुक ते करीत. बाकीच्यांचं कर्तृत्व त्यांच्या लेखी कटाप होतं. नव्यांना त्याचं सोयरसुतक नव्हतंच. लेकीच्या कलात्म लेखणीचं त्यांना बाजवी कौतुक होतं. परंतु अत्र्यांच्या लिखाणाच्या डोंगराआड बुडून राहिल्यामुळे शिरीष पैंच्या गुणी लेखनाचा झळाळ क्षितिज उजळू शकला नाही. ही दोघांचीही हानीच म्हणावी लागेल.

## संकल्प अपुरे राहिले

संयुक्त महाराष्ट्राच्या घडणीसाठी त्यानी दिलेली झुंज संपली त्यानंतरची आठ नऊ वर्षे ते घसरगुंडीलाच लागले होते. पाच सहस्र पृष्ठांचं आत्मचरित्र पुरं करण्याचं स्वप्न, जुन्या भाषणा-लेखनाचा भुगा सार-सारूनही थंडावलं. 'महाराष्ट्र-पंचक'ची राजकीय घोषणा हा केविलवाणा फार्स ठरला. समितीला ते पार विटले. तो विस्तारा बंद करण्याची घोषणा त्यांच्या अंगाशी आली. ते किटाळ त्यांनी शिताफीने प्र. स. पक्षावर ढकललं. चिनी आक्रमण हे नकाशाचं भांडण आहे, तिबेटी स्वातंत्र्याचा प्रश्न 'टिबेटके बेटे' निष्कारण उकरीत आहेत, हंगेरीच्या स्वातंत्र्यवीरांचा आत्मयज्ञ हे मेड-इन्-अमेरिका थोतांड आहे, चीनविरुद्ध इंच इंच लढवू म्हणतील त्यांची आम्ही पेकाटं मोडू, ह्या त्यांच्या प्रलापांमागचा बोलविता धनी कोण आहे हे सूज्ञांना कळू लागले. पण अत्रे वेळीच सावध झाले. त्यांनी वाऱ्याची दिशा नीट ओळखली. जनतेच्या भावनांची खोली अजमावली. तसा अत्रे हा मोठा अष्टावधानी माणूस ! शास्त्रींना पाठिंबा देणं भागच होतं. तशात हा पुरुष लेखणीचा भक्कम होता. म्हणता म्हणता त्यांनी लेखमाला लिहून दाखवल्या. नाटकं लिहून दाखवली. मात्र राष्ट्रापुढच्या जिवंत प्रश्नांबद्दल लिहा रे, म्हणून इतरांमागे गैरलागू तगादा लावणाऱ्या ह्या चटकदार नाटककाराने परकी आक्रमणाच्या विषयावर नाटकं न लिहिता चार चव्वल हुकमी मिळतील अशी 'मी मंत्री झालो', 'ब्रम्हचारी', 'प्रीतिसंगम'सारखी करमणूकप्रधान नाटकं लिहिली; सर्वत्र फिरवली. जोडीला प्रकृतीही हटत चालली होती. दोनदा पडले. हाडं मोडली. त्यातूनही उठले. सलामत राहिले. निवडणुकीला जिद्दीने उभे राहिले. दिल्ली गाजवेन म्हणाले. पण दोन्ही वेळेला पडले. ह्या सणसणीत पराभवाने मात्र त्यांचे प्राण कंठाशी आले; ते साक्षात् दुभंगले.

लोकसभेतल्या निवडणुकीतल्या अखेरच्या पराजयानंतरचं आचार्य अत्र्यांचं आयुष्य म्हणजे एक शोकात्म वाताहत आहे. वैयक्तिक भावजीवनातलं वाळवंट वाढायला लागलं. आपल्या सत्तराव्या वाढदिवशी सत्तर लखकांचा सत्कार करण्याची भव्य योजनाही बारगळली. सटर-फटर मजकुराने वर्तमानपत्राचे अंक सजवावे लागले. एकूण उद्योगातली नशाच आटली. देहाच्या तक्रारी सुरू झाल्या. वजन आवाक्याबाहेर वाढलं. उरळी कांचनच्या निसर्गोपचाराची कास धरावी लागली. फडक्यांशी मैत्रीचा गरजू तह झाला. एक गंमत झाली. अटळ म्हातारपण त्यांच्यावर कबजा मिळवू लागल्याची ती निशाणीच होती. तशात, पहावं तिकडे सामर्थ्यशाली शिवसेनेचे विजयी झेंडे फडकायला लागले. विजयपताकांचा तो समुद्र केरसुणीन कसा हटवणार ? अत्रे हतबुद्ध झाले.

इतकं असूनही जिद्दी जीवनेच्छमुळे आचार्य बुलंद ठरले ! ओहोटीचं पाणी पायाखालून सरकत असतानाही सगळे व्याप वाजत गाजत उरकू लागले. नवे संकल्प सोडू लागले. गुजराती नाटकवाल्यांना थकबाक्यांचं स्मरण देऊ लागले. आग्रहपूर्वक स्वाक्षऱ्या देऊ लागले. अध्यात्मिक प्रवचनं घडवून आणू लागले. ती ऐकण्याची पुन्हा साहित्यिकांना गळ घालू लागले. घरी सर्वांचा, विशेषतः साहित्यिकांचा प्रेमळ सत्कार करू लागले. अहो, अखेर अखेर तर त्यांना जिव्हाळ्याच्या मैत्रिचीच तहान लागली होती. पण ओंजळभर स्वच्छ पाणीच कुठे मिळेना ! बांद्रयाला साहित्यिकांच्या वसाहतीत जाऊन अखेरचे दिवस आपल्या हृदयस्थ प्रियजनांच्या सहवासात

(पृष्ठ १८ वर पहा)



अनुक्रमणिका

# मरावे परी अग्रलेखी उरावे

—गो. शं. हुजूरबाजार



**आमच्या धन्यतेची इतिश्री झाली....नभोमंडळातील तेजस्वी सूर्याचे ते विलोभनीय दृश्य लुप्त झाले.... आता उरल्या फक्त आठवणी....**

योगायोगावर माझा पुरा विश्वास आणि आचार्य अत्र्यांच्या शिवशक्तीत मी प्रथम पाऊल ठेवले ती सहा वर्षापूर्वीची अनन्त चतुर्दशी (१ सप्टेंबर १९६३) आठवली की अंगावर रोमांच उभे रहातात. मुंबईत मी नवखाच होतो. मला 'शिवशक्ती'तील कार्यक्रमाची चिठ्ठी पाठवून खबर देणारे प्रा. मनोहर आळतेकर – त्याना कशी काय प्रेरणा झाली न कळे ! सत्कार समारंभ होता. श्री. जयन्त नारळीकरांचा. जाहिरातबाजीचे वावडे असणाऱ्या या आमच्या भाच्याने मुळीच कळवले नाही मला. डॉ. हॉईल यांच्या समवेत ज संशोधन झाले व यशाने ते उजळून निघाले त्यापूर्वीचा हा प्रसंग आहे. 'शिवशक्ती'च्या पहिल्या मजल्यावरील छोटचाशा दालनात नामांकित गणिती, वकील, डॉक्टर व पुढारी एकठ्ठा झालेले होते. त्यांना पाहून मी दबलो. पण, कुठल्यातरी अदृश्य शक्तीने मला आचार्य अत्र्यांच्या धिप्पाड देहासमोर उभे केले आणि माझ्या तोंडून शब्द आले, 'साहेब, मी चार शब्द बोलू इच्छितो. परवानगी असावी'. हे ऐकून त्यानी मला व माझ्या सौ. ला सन्मानपूर्वक आपल्या सौ. शेजारी पहिल्या कोचावर बसवले. अध्यक्ष रँ. गणेश महाजनी न येऊ शकल्याने म. म. दत्तोपन्त पोतदारांची प्रतिष्ठापना झाली. प्रास्ताविक झाले व माझे नांव पुकारण्यात आले. 'मी मामाचा मान मजकडे घेत आहे. पण मी काही साहित्यिक–मामा नाही !' या वाक्याने आचार्य अत्रे यांच्या सकट सारी सभा एकमुखाने हसली व टाळ्या पडल्या. हे मला कसे सुचले देव जाणे ! कदाचित् 'हशा व टाळ्यां'च्या बादशहाच्या जवळ उभा राहून बोलत राहिल्याने थोडा गुण 'न जाणता' लागला असावा मला.

आता इथे अत्रे-नारळीकर यांचे नाते किती जुने आहे ते नमूद करतो. रँग्लर परांजपे यांना गडकरी मास्तर फार मानीत. गणितात असामान्य कीर्ती करणारा (१८९९) हा कोकणचा ब्राह्मण रस्त्यात भेटला की लोटांगण घालावे असे गडकऱ्यांना वाटे. तीच परंपरा प्रिन्सिपाल प्र. के. अत्रे यांनी (आचार्य ही उपाधि स्वातंत्र्यवीर सावरकरांकरवी पुढे लाभली) रँ. विष्णुपंत नारळीकर यांच्या बाबतीत चालविली. अत्रे हे मास्टर विनायक यांच्या सहवासात असता ते रँ. विष्णुपंत नारळीकरांच्या सान्निध्यात आले. 'ब्रह्मचारी' बोलपटाचे बाळंतपण चालू असता बनारसहून सुटीतून कोल्हापुरास येऊन राहिलेले प्रा. नारळीकर प्रसूतिगृहात डोकावीत. 'एक गंजीफ्रॉक आणि चड्डी' असे वर्णन अजूनही काल घडल्यागत प्रा. नारळीकर सुनावतात. ब्रह्मचारीच्या पहिल्या प्रयोगास ते हजर होते. 'पुणे-कोल्हापूर एका डब्यातून प्रवास. अत्र्यांच्या बरोबर साहित्यिक गप्पा म्हणजे गिरसप्पाच्या धबधब्याच्या तुषारात अनेक तास बसून रहावे, तसे वाटे' असे. 'ते हि नो दिवसाः गताः' या चर्येने प्रा. नारळीकर सांगतात. अशा नारळीकरांचा पुत्र जागतिक कीर्ती करतो हे समजून आचार्य अत्र्यांनी त्या अनन्तचतुर्दशीस सत्कार-समारंभ आयोजित केला होता. नंतर पुढील वर्षाच्या जूनमध्ये हॉईल–नारळीकर सिद्धान्ताचा जगभर बोलबाला झाला व आचार्य

अत्र्यांनी 'विश्वरत्न' ही स्वयंस्फूर्त पदवी डॉ. जयन्त नारळीकरांना बहाल केली. त्यानन्तर सहा महिन्यांनी राष्ट्रपतींकडून 'पद्मभूषण' ही पदवी इतरांसमवेत दिली गेली, तरी पण एका मराठी माणसाच्या मुखातून खुल्या दिलाने अलेल्या उपाधीस अधिक महत्त्व येते. शासनाच्या अर्थविहीन व छापीव पदव्यांवर 'मराठा' दैनिकाने उठाव केल्याचे आठवते. आचार्य अत्रे हे मनात आले की प्रासादिक पदवी-दान करीत. याचे अलीकडील उदाहरण म्हणजे त्यांनी श्री. भालजी पेंढारकराना दिलेली 'चित्रयोगी' ही पदवी. ही पदवी बहाल केल्यावर हा साहित्ययोगी कालिळीने जर्जर झाला आणि पदव्यांच्या पैदाशीची इतिश्री झाली. तो अधिकार आता कोण घेऊ धजावणार ?

गणिताने जसा मी आचार्य अत्रे यांजकडे आकर्षिला गेलो तसा गाण्यानेही. स्वतः गुणी असून गुणज्ञ असणे व गुणांची वाखाणणी करणे हे बहुतेक साहित्यिकांना जमत नाही. आचार्य अत्रे हे तर मधाचा वास मधमाशीला लागावा तशा सुगाव्याने चौफेर संचार करीत. 'आपण दादरची माणसं' या सम्मेलनातील संगीत स्पर्धेत आमच्या चि. अलंकार यास एक बक्षीस मिळाले. त्याचे तंबोऱ्या-सहित छायाचित्र त्यांनी साजेशा मजकुरासकट प्रसिद्ध केले. शीर्षकही सुंदर असे ठवून दिले "गणिती वंशात गाणारा चिरंजीव" सुभाष हॉलची उभारणी झाली व देशगौरव सुभाषचंद्र बोस यांच्या जन्म-दिनी शाहीर अमरशेख यांनी रोमांचकारी गीत म्हटले. आझाद हिंद सेनेतील एक संघ गीत ठसक्यात गाऊन दाखवून चि. अलंकारने त्या लेखनातील गौरव सार्थ केला.

'मरावें परी अग्रलेखीं उरावें' या शीर्षकाचे एक पत्र मी आचार्य अत्रे यांना धाडले, ते जसेच्या तसे 'पांचामुखी'त प्रसिद्ध झाले. 'मरणान्तानि वैराणि' हे आचरणारे आचार्य अत्रे हे एकटेच साहि-त्यिक. चित्रमहर्षि श्री. बाबूराव पेंढारकर, मित्रवर्य कृ. पां. कुलकर्णी, बालगंधर्व, सिनेतारका शांता आपटे, प्राचार्य बाळासाहेब खर्डेकर आणि सर्वात म्हणजे ब्रह्मर्षि श्री. दा. सातवळेकर, इत्यादि अनेक. अग्रलेख म्हटला की साक्षेपी फोटो आलाच. फोटोच्या बाबतीत काही वृत्तपत्रांनी चालविलेली छळवणूक पाहिली की मन उद्विग्न होते. मा. विठ्ठल वैकुंठवासी झाले व एका उच्च श्रेणीच्या दैनिकाने त्यांचा नेताजी पालकरच्या भूमिकेतील फोटो पहिल्या पानावर छापला ! स्व. जगन्नाथ बुवा अकस्मात् स्वर्गवासी झाले आणि लगोलग तयार केलेला लेख मी आचार्य अत्र्यांच्या हाती पोहोचता केला. फोटो त्यांनी कसा कुठून पैदा केला देव जाणे, पण त्या फोटोमुळे लेखाला जिवन्तपणा आला, हे खास; आणि जिवन्तपणा हा तर आचार्यांच्या स्वभावाचा स्थायीभाव.

चूक दुरुस्त करण्याच्या मोठेपणामुळे आचार्य अत्रे हे मोठ्यात मोठे वाटतात; याचा अलीकडील स्वानुभाव कथन करतो. आचार्य अत्रे हे प्रकृति-उपचारार्थ पुण्यास उरुळी कांचन आश्रमात गेले ही संधि साधून श्रीमत् दत्तयोगेश्वर देवतीर्थ स्वामी महाराज यांची बदनामी करणारा मजकूर व फोटो एकाने 'मराठा' दैनिकाकडे पाठविला. मजकूर प्रसिद्धीनंतर पुण्यातील श्री स्वामीजींचे भक्त आचार्य अत्र्यांना भेटले. 'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा, करिष्ये वचनं तव' असे म्हणून तदनंतर पुण्याच्या दैनिकात व 'मराठ्यात' खुलासा प्रसिद्ध झाला. हे काहीच नव्हे. श्री स्वामी मुंबईस येताच आचार्यांनी स्वतःची गाडी श्री स्वामीजींकडे पाठविली व शिवशक्तीतील अभ्यासिकेत श्री स्वामीजींचा सत्कार केला. ती प्रश्नोत्तरे ऐकायला मिळाल्याचे भाग्य लाभल्याने आम्हीही धन्य झालो.

आमच्या धन्यतेची इतिश्री झाली याचा खेद होतो. धन्यता अशी की, अत्र्यांचे व्याख्यान म्हटले की शिवाजीपार्कवरील सहस्रांच्या सभेत मांडी घालून बसावे, हसावे मनसोक्त आणि टाळ्या पिटाव्या. सागरतीरावर सूर्योदयापूर्वी पंचवीस तीस नागरिक पदयात्रा करीत आहेत, आचार्य अत्रे त्या संमिश्र मंडळीत तारामंडळातील सूर्याप्रमाणे भासत. त्यात सर्व धर्मांचे लोक असत, नाना प्रांतांचे—पायात काही नाही, खाकी चड्डी व लांडा बनीयन—फिरणे संपले की ही मंडळी पाय पसरून वाळूत बसत. ते विलोभनीय दृश्य आता संपले.

•••

[ पृष्ठ १६ वरून—मरावे परी अग्रलेखी उरावे ]

चवीने काढण्याची त्यांना आस लागली होती. तोही आरसा फुटला. तरीसुद्धा असेल नसेल ते सगळं अवसान गोळा करून ते सोयीस्कर सभास्थानापर्यंत अट्टाहासाने जाऊ लागले. जड जीभेने बोलू लागले. नव्या ग्रंथांचा सक्रिय पुरस्कार करू लागले. आपण जोसात आहोत ह्या मानीव आनंदात राहिले. लेखणी, वाणी आणि सर्व स्तरांवरला बेमालूम अभिनय, ह्या तीन विद्यांच्या बळावर उभी केलेली इस्टेट सार्वजनिक विश्वस्त निधी निर्माण करून समाजार्पण करण्याची त्यांनी खबरदारी घेतली. आणि आसभास नसताना परवा एकदम आजारी पडले. गाजावाजा झाला. धावाधाव झाली. आचार्यांना वांचवण्याची शिकस्त झाली. पण अखेर मानवी प्रयत्न थिटे पडले. बधिरावस्थेत पहुडल्यानंतरही 'मी परत तुमच्यात येतोय' अशी क्षणिक हूल देऊन तो महाकाय महाप्रतापी पुरुष प्रभुचरणांपाशी लीन झाला. कसा ? मागे निवडणुकीच्या धांदलीत ते माझ्या घरी आले होते. पूर्ण थकले होते. 'अहो, मला मत द्या', हे शब्द उच्चारण्याचं त्राणही त्यांच्या गळ्यात शिल्लक नव्हतं. हातात एक गुलाबाचं टपोरं फूल होतं. तेच त्यांनी मंद स्मित करीत माझ्या वडिलांच्या हातात ठेवलं. आणि निःशब्द निरोप घतला. परवा मृत्यूसमोरसुद्धा त्यांनी आपलं टपोरं जीवनपुष्प तसंच मंद स्मित करीत ठेवलं आणि हशा-टाळ्यांच्या वर्षावासहित एका भाविक पिढीवर गारुड केलेल्या आचार्य अत्र्यांनी लळा लावलेल्या दुनियचा निःशब्द निरोप घेतला !

•••

# अथवा, एका तेलशुद्धीकरण कारखान्या मार्फत दोन कारखान्यांचं काम करून घेण्याची खुबी.




नवे तेलशुद्धीकरण कारखाने उभारण्याच्या गोष्टी बोलायला ठीक. पण त्यांत ३० ते ४० कोटी रुपयांचा भुर्दंड आहे. पेट्रोलियमजन्य पदार्थांची मागणी आजच्या १४० लक्ष टनांवरून १९७५ च्या सुमारास ३०० लक्ष टनांवर जाईल. ती पुरी करण्यासाठी देशाला केवढा खर्च येईल याची कल्पना आहे? १६० लक्ष टनांच्या शक्तीचा तुटवडा भरून काढण्याची ही समस्या म्हणजे मानवी कर्तृत्वाला आव्हान आहे.

तेल "शुद्धीकरणाची"च समस्या घ्या ना. नवे कारखाने उभारल्याशिवाय भारताला आपली तेलशुद्धीकरणाची क्षमता दुप्पट करता येईल काय? जरूर... सार्वजनिक तसेच खाजगी क्षेत्रातील कारखान्यांचा विस्तार केल्यास प्रत्येक कारखाना दोन कारखान्यांचे काम सहज करील. उदाहरणार्थ, एस्सोच्या मुंबईतील तेलशुद्धीकरण कारखान्याचा विस्तार केल्यास फक्त $\frac{1}{3}$ खर्चात एक संपूर्ण नवीन कारखाना उभारल्या इतकाच फायदा होईल.

एस्सो आहे व्यापारी संस्था. भारताचे हित तेच तिचेहि हित. १६० लक्ष टनांचा तुटवडा भरून काढण्याच्या कामात सर्वांनाच सहभागी होता येईल. सद्य:परिस्थितीत भांडवल, यंत्रसामग्री व अनुभवी तंत्रज्ञ, आणि कामगार यांचा जास्तीत जास्त व उत्तमात उत्तम उपयोग करून घेतला पाहिजे. पुढे येणाऱ्या जबाबदाऱ्यांमधून आपल्या वाट्याचे ओझे उचलण्याची एस्सोची तयारी आहे.

**एस्सो शक्तीची तूट भरून काढण्यास हातभार लावू शकेल.**




INDIA

CHEPR-3-304 MR










—ना. व्यं. देशपांडे

# कागविष्ठेचे झाले पिंपळ

सेशन कोर्टाच्या लिफ्टच्या पिंजऱ्यापुढे बरीच मोठी रांग लागली होती. तिच्याबरोबर असलेला हवालदार म्हणाला : "इथं बराच वेळ ताटकळत उभं राहावं लागेल बाई. चला, जिन्यानंच चढून जाऊ."

तेव्हा वत्सला मुकाटयानं जिन्याकडं वळली आणि त्या काळ्याकभिन्न इमारतीच्या काळ्या पायऱ्या चढू लागली. इथलं सगळं वातावरणच काळं एकूण ! इमारतीचे दगड काळे, लिफ्ट काळी, लिफ्टचा सरकता दरवाजाही काळा, लिफ्टमन्‌ही काळा, इकडून तिकडे फिरणाऱ्या वकिलांचे कोटही काळे !

तीन जिने चढून आल्यानंतर वत्सलेला दम लागला. शेवटची पायरी चढून आल्यानंतर ती क्षणभर थांबली. समोरच्या उघडया गॅलरीतून वाऱ्याचा एक झोत झरंदिशी येऊन तिच्या चेहेऱ्याशी झोंबून गेला. तिनं आधाशासारखा तो झोत पिऊन टाकला. तेवढेच बरं वाटलं तिला. उजवीकडच्या बाजूच्या खोलीकडे बोट दाखवीत हवालदार म्हणाला : "इथं या खोलीत बसा बाई. कोर्ट सुरू व्हायला टायम् आहे." असं म्हणून तो निघून गेला.

यांत्रिकपणेच ती त्या खोलीत शिरली. आत कोणी एक कारकून एका टेबलावरील कागदाचे गठ्ठे उपशीत बसला होता. बाकी कोणीच नव्हते तिथे. ती आत आल्यानंतर त्याने एक वेळ तिच्याकडे पाहिले आणि पुनः तो आपल्या कामात गर्क झाला. ती क्षणभर घुटमळली. कोणी तरी विचारील : "काय हवंय् आपल्याला ? बसा इथं . . . " अशी तिची अपेक्षा होती. ती क्षणभर उभी राहिली. आणि शेवटी एका खुर्चीवर बसली. समोरच्या दरवाजातून गॅलरीमध्ये येणारी-जाणारी माणसे दिसत होती. निळे डगले घातलेले एक-दोन पोलीस उगीचंच इकडून तिकडे जात होते. मध्येच एक हॉटेलचा पोऱ्या बोटांमध्ये कपांचे आंगठे गुंतवून एका हातात किटली घेऊन गेला. त्याला बोलवावे आणि आपण एखादा कढत सिंगल घशाखाली उतरवावा असे तिला क्षणभर वाटले. इतक्यात एकदोन कळकट माणसे आत डोकावली.

"जाधव आले नाहीत काय हो अजून ?" एकाने पृच्छा केली.

"नाऽही." कोपऱ्यातल्या कारकुनाने मान वर न करताच उत्तर दिले.

आता बाहेरील गॅलरीत पुनः काळ्या रंगाची वर्दळ सुरू झाली. काळा कोट घातलेल्या वकिलांना आता पंख फुटल्यासारखे दिसत होते. तिला कुतुहल वाटले. काखेमध्ये लांबोडकी पुडकी खोचून आपला काळा झगा सावरीत ते इकडून तिकड फिरत होते. वाऱ्यामुळे त्यांचे झगे फुगीर होत होते. आपले कुरुप, अवाढव्य पंख पसरून आपल्या भक्ष्याभोवती घिरटया घालणाऱ्या गिधाडांची आठवण झाली तिला.

गिधाडांची कल्पना मनात येताच विजेच्या प्रवाहाचा झटका बसावा त्याप्रमाणे तिला झाले.

कितीही नको म्हटले तरी तिच्या डोळ्यांसमोर गिधाडे नाचू लागली. अक्राळ विक्राळ, क्रूर, घाणेरडी

भर दुपार. करकरीत ऊन निळ्याभोर आकाशात आठदहा गिधाडे संथपणे पंख पसरून घिरटया घालीत आहेत. रस्त्याच्या कडेला एक जीप उभी आहे. संपूर्ण आसमंत निर्मनुष्य आहे.

**.... " आई " रवीचा आवाज ऐकताच वत्सलेनं लगबगीनं दिवा मालवला आणि पायाशी पडलेलं पातळ पांघरून घेतलं. डोळे घट्ट मिटून घेतले....नंतर चपकन तोंडात मारल्याचा आवाज तिनं ऐकला....**

असलीच तर दूर कोठे तरी झुडुपांच्या आड धूर ओकणारी एखादी हातभट्टी !

'उतर भडव्या ' कुणीतरी खेकसून म्हणते.

एक काटकुळी आकृती उतरते. पाठीत एक टोसा बसतो. तोंडातून एक शब्दही फटत नाही. गिधाडांच्या दिशेने तो बोट करतो. सर्वजण तिकडे चालू लागतात

विलक्षण दुर्गंधी नाक कोंडून टाकते नाकाला रुमाल लावले जातात.

"साहेब, एक कॅनव्हास बूट मिळाला आणि मोजा पण."

"अरे, ती हाडं गोळा कर सगळी. कवटी मिळाली ना ? छान्. वय काय होतं ?"

कुणी तरी वय सांगते.

निळ्या डगल्यातली आंतडीसुद्धा तुटतात.

"चड्डीची पार जाळी झालीय् साहेब."

"शिंदे तिथली माती खरवडून घे थोडीशी."

"साहेब हे दगड घेऊ काय बघा ? रक्ताच्या डागासारखं काहीतरी दिसतंय् .."

पोलीस चौकीवर शून्य नजरेने टेबलावरच्या वस्तू ती पाहात असते. कुरतडलेला मोजा, भोके भोके पडलेली निळी चड्डी, कॅनव्हासचा बूट . . .

"बाई ओळखता ना तुम्ही ?"

ती मानेनेच हो म्हणते. तिला तेथे बसवत नाही. रडूही येत नाही. डोळे तारवटलेले असतात. त्यातले उरलेसुरले पाणीही तहानलेल्या गिधाडांनी पिवून टाकलेले असते

वत्सला खिडकीबाहेर पुनः पाहू लागते. बाहेर पंख पसरलेली गि . . . किती नको म्हटले तरी वकिलांच्या उडणाऱ्या झग्यांना पाहून गिधाडांच्या पंखाखेरीज दुसरी कोठलीच प्रतिमा तिच्या डोळ्यांपुढे येईना.

"चलो . . . हटो . . ." असा पुकारा झाला. गॅलरीतले लोक बाजूला झाले. दोन निळे डगलेवाले पोलीस दोन्ही हातांनी वाटेतली वर्दळ बाजूला सारीत पुढे झाले. त्यानंतर पट्टेवाला. त्याच्या मागून काळा झगा घातलेले न्यायाधीश निघून गेले. होडी पुढे सरकल्यानंतर दुभंगलेले पाणी पुनः एक व्हावे त्याप्रमाणे दुभागलेले लोक पुनः मिसळले. आता गॅलरीतला गलका वाढला.

पुनः दुसरे दोन पोलीस एका इसमाला दोहो बाजूंनी धरून घेऊन गेले. वत्सलेने त्याला पाठमोरे पाहिले. तीच काटकुळी आकृती. तोच दोरवा शर्ट त्याने आताही घातला होता. आता बराच मळला होता. तरीही पाठीवर फाटलेल्या जागी घातलेली शिवण तिला स्पष्ट दिसली. तिने गच्च डोळे झाकून घेतले.

"कोण हा ?" तिने स्वतःशीच विचारले.

एकाद्या भग्न प्राचीन मंदिराच्या काळोख्या गाभाऱ्यात उभे राहून मोठ्याने ओरडावे आणि त्या ओरडण्याचा विचित्र, विदारक प्रतिध्वनि ऐकावा आणि मन शहारून उठावे तसे तिला झाले.

"कोण हा?" "कोण हा?"...शरीराच्या अंगप्रत्यंगाच्या कुहरातून प्रतिध्वनी उमटत गेला. तिने कानात बोटे घातली. तरीही प्रतिध्वनी घुमतच गेला

ती शिवण्याच्या मशीनवर बसली होती. तो समोर हातात तोच शर्ट घेऊन उभा होता. रागारागाने बोलत होता

"बघ. मुद्दाम ब्लेडने चिरलेला आहे. त्याचंच हे काम. शिवून दे आत्ताच्या आत्ता." त्याच्या बोलण्यात जरब होती.

तिने तो शर्ट हातात घेतला. पाठीवरल्या भागावर कुणीतरी ब्लेडने चीर पाडली होती.

"उगीच रवीवर आळ कशाला घेता ?"

तो एकदम भडकला.

"मग दुसरं कोण येणार या घरात ? त्याच्याशिवाय दुसरं कुणीही असणं शक्य नाही तो माझा द्वेष करतो

संतापानं त्याचे ओठ थरथरत होते.



"अजून पोरवय आहे. अद्याप लळा लागायचा आहे त्याला. जन्मदात्या बापा-वर देखील कित्येक वेळा प्रेम वसत नाही. तिथे . . . ."

"तुमचा काय मुलाहिजा ? असंच म्हणायचंय् ना तुला ? मी कोण तुमचा . . . ?" दाणदाण पाय आपटीत तो निघून गेला.

मग किती तरी वेळ त्या शर्टाच्या चिरीकडे शून्य नजरेने पाहात वत्सला वसली होती. तिने मशीनवर पाय दिला. तिच्या लक्षात आले की चाकाची दोरी निसटली आहे. मग तिने प्रयासाने दोरी अडकवली. अन् वराच वेळ मशीनचा पाय दाबू लागली. चक्र किती वेळ फिरत होते कुणास ठाऊक ? नंतर तिच्या लक्षात आले की आपण शर्ट मशीनखाली ठेवा-यच्या ऐवजी हातातच ठेवलाय् म्हणून !

"मी कोण तुमचा ?" विठ्ठलने प्रश्न केला होता. मशीनचे चक्र उत्तर देत होते. . . गर्र् गर्र् . . . गर्र् . . .

एक दिवस शाळेतून आल्यानंतर रवी रुसून वसला.

"काय झालं माझ्या सोन्याला ? असा राग कां आलाय् ?" वत्सलेनं त्याला कुरवाळीत विचारलं.

त्यानं तिचा हात झिडकारला . . .

"आई, विठू मामाला शाळेत डबा पोचवायला सांगू नकोस."

"कां रे ?"

"मला आवडत नाही तो."

"असं वेड्यासारखं बोलू नये. किती प्रेमानं तुझ्यासाठी ते करतात."

"सारं खोटं मुलं मला चिडवतात. तो कोण लागतो ग आपला ?"

वत्सला चिडीचूप वसली. निरुत्तर झाली. तिनं काही तरी उडवाउडवीचं उत्तर दिलं.

मग आपले चिमुकले हात तिच्या गळ्याभोवती टाकीत त्यानं विचारलं : "तू कां नाही ग येत डबा घेऊन ?"

त्याच्या रेशमी झुलपातून हात फिर-वीत ती म्हणाली : "येत्या एक तारखे-पासून मी नोकरी सोडीन हं . . . मग मीच येत जाईन . . . झालं ना समाधान. जा आता खेळायला."

तो उड्या मारीत वाहेर गेला.

जमिनीवर बोटांच्या नखांनी अदृश्य रेघोट्या मारीत ती तेथेच शून्यमनस्क बसली होती.

आतादेखील पायाच्या वोटांनी जमिनी-वर अदृश्य रेघोट्याच मारीत होती ती.

एकाएकी कोर्टातल्या त्या काळपट खोलीत मंद मंद निळसर असा अद्भुत प्रकाश पसरला. कोपऱ्यातला तो कारकून आणि ते कागदाचे गठ्ठे अदृश्य झाले. वाहेरचा गलका शांत शांत झाला. ती वसली होती त्या खुर्चीची झाली गादी. रात्रीचे साडे अकरा वाजायला आले होते. कोपऱ्या-तील घडवंचीवर तिचे पोलके आणि तिची बॉडीस् होती. पायथ्याशी अस्ता-व्यस्त पडलेले पातळ आणि गोलाकार पडलेला परकर ! पोलक्यावर ठेवलेली सायलीची वेणी त्या छोट्या खोलीत सुगंध दरवळून टाकीत होती. आणि पाण्यामध्ये वर्फ वितळावा तशी ती वितळत चालली होती.

'आई . . . ' रवीचा आवाज ऐकताच वत्सलेने लगवगीने दिवा विझवला आणि पायाशी पडलेले पातळ अंगावर पांघरून घेतले. डोळे घट्ट मिटून घेतले. काय होत आहे हे समजण्याच्या आतच रवीने विठ्ठलच्या तोंडात चपराक मारल्याचा आवाज फक्त तिला ऐकू आला.

—इतक्यात खोलीच्या दाराशी पावले वाजली आणि निळा प्रकाश अदृश्य झाला. वत्सलेने चमकून पाहिले. सरकारी वकील पोलीस इन्स्पेक्टरबरोबर आत येत होते. दोघांनाही पाहिल्यावर वत्सला गोंधळून गेली. उभी राहण्याचा प्रयत्न करू लागली.

"ही आपली कंप्लेनंट, साहेब". इन्स्पे-क्टर.

"अस्सं" वॅंडस् वांधण्यासाठी वाकड्या केलेल्या मानेने सरकारी वकिलांनी तिला आपादमस्तक न्याहाळले. शस्त्रक्रियेपूर्वी सर्जन रोग्याला न्याहाळतो त्याप्रमाणे. बॅंडस् बांधून झाल्यानंतर सरकारी वकि-लांनी बॅगेतून कागदांची चळत वाहेर काढली आणि ते निघाले. जाताना त्यांनी पुनः एकदा वत्सलेकडे पाहिले आणि ते म्हणाले : "तुम्हाला थोड्या वेळानं बोला-वीन."

ते वाहेर पडल्यानंतर तो इन्स्पेक्टर वत्सलेच्या कानाशी गुणगुणला : "कोर्टात काय काय सांगायचं ते लक्षात आहे ना ?" वत्सलेने नुसतीच मान हलवली.

तो वाहेर गेल्यानंतर खोलीत भयाण शांतता पसरली. कोपऱ्यातल्या त्या कार-कुनाने आता टाईपरायटरची टिक् टिक् सुरू केली होती.

"काय सांगायचं कोर्टात ?" ती स्वतःशीच विचारत होती.

टाईपरायटर चालू होता. टिक् टिक् टिक् टिक् टिक् टिक् टिक्

त्या दिवशी पाऊसही असाच आवाज करीत पडत होता. खिडकीबाहेरील पत्र्याच्या शेडवरही टिक् टिक् टिक् टिक् . . चालू होते.

गॅलरीच्या कठड्यावर रेलून वत्सला दूरवर पाहात होती. मे महिन्यातला अडोळसा पाऊस होता तो. उन्हे चांगलीच कलली होती. आकाशात चारपाचच काळे ढग होते. सुसाट वारा सुटला. पाचोळा हवेत थरथरला. पिवळे ऊन भिजून चिंब होऊ लागले. आकाशातला ढग वत्सलेच्या म्हाताऱ्या आजीसारखा दिसत होता . . .

जणु श्रावण पुनः अवतरला होता. देवा-पुढील नंदादीपाच्या अंधुक प्रकाशात वत्सलेची आजी सर्व नातवंडांना कथे-कऱ्याच्या सुरात श्रावण शुक्रवारची कहाणी सांगत होती—

"मग ती तूप वाढायला आली . . . वाढता वाढता राजपुत्राच्या पानापाशी आली. तूप वाढता वाढता तिच्या थानातून दुधाची चिळकांडी उडाली. राजपुत्राच्या तोंडावर दूध उडाले. ती शरमिंदी झाली. पंक्तीतले लोक हसायला लागले. राजपुत्र उठून गेला . . . "

पाऊस अजून पडत होता. रवी अद्याप शाळेतून परतला नव्हता. एवढा वेळ त्याला कधीच लागला नव्हता. त्याला पाहण्यासाठी ती गॅलरीत आली होती. आणि पाऊसधारा लागल्या होत्या. ती आपल्या आयुष्याचे धागेदोरे तपासून पाहात होती. ढगातून पडणाऱ्या पावसाच्या धारांप्रमाणेच ते तुटक आणि अधांतरी होते. आसमान आणि जमीन यांना सांधणारे पण न सांधणारे . .

पाहता पाहता कहाणी सांगणारी आजी विरून गेली. वत्सलेच्या वक्षःस्थळांना मात्र कळा लागल्या. हुरहुरत्या मनाने नि भिरभिरत्या नजरेने ती रस्त्यावर पाहू लागली.

पाऊस अद्याप कोसळत होता.

रवीच्या वडीलांचे ते अपघाती निधन... त्या एकाकी असाहाय्य जीवनात विठ्ठलचा प्रवेश. असाच अडोळशा पावसासारखा अचानक. चाहूल लागू न देता. अडोळशा पावसासारखाच जीवनाची तलखली घालवणारा उन्मत्त मातीतला सुगंध बाहेर काढणारा सारे सारे उधळून टाकणारा. विठ्ठलने मिठी मारली ती साखळदंडासारखी न तुटणारी छातीवर ही मिठी तर पायाशी ती !

रवीन्द्र . . . रवी रवी

त्याचा आपल्याजवळ झोपण्याचा हट्ट. तर विठ्ठलचे ते फुरंगटून बसणे. रवी झोपी गेल्यावर त्याला हातात घेऊन पलीकडे दूर झोपवणे . . . त्या कुत्तर ओढीतील . . .

रवी अजून दिसत नव्हता. आता रस्त्यावर काळोख पसरत चालला होता. वत्सला डोळे ताणून पाहू लागली.

अलीकडे जवळ झोपण्याचा हट्ट रवीने थांबवला होता. अजाणता थांबवला होता.

आता सूर्य पुरता मावळला. वत्सला कावरी-बावरी झाली. रवीला शोधण्यासाठी विठ्ठललाही पाठविणे शक्य नव्हते. त्याची रात्रपाळी होती.

कधी नाही ते ती शेजारीपाजारी गेली. त्यांना पुसू लागली. दीनवाणी झाली. उगाचच वाण्याकडे जाऊन आली. पिठाच्या चक्कीवाल्याला विचारून आली. पण पत्ता नाही. कुठं रागावून तर गेला नसेल ना पोर ? तिच्या डोळ्यांपुढे काजवे चमकू लागले. 'हरवल्याचा शोध' तो फोटो, तो ठराविक मजकूर. वृत्तपत्रांच्या जाहिराती तिच्या नजरेसमोर फेर धरू लागल्या. लांबोळका चेहेरा, हृदयाचा ठाव घेणारे गहिरे डोळे, किंचित् पोपटाच्या चोचीसारखे नाक. कुणी पहिला का माझा मुलगा ? त्याला विठ्ठल आवडत नाही. तोडून टाकू त्याचे संबंध. त्याचे काय एवढे मोठे ? रात्रभर तिच्या डोळ्याला डोळा लागत नव्हता. एकसारखे मन किंचाळत होते. पिलासाठी चिवचिवाट करणाऱ्या चिमणीप्रमाणे.

पहाटे रात्रपाळी संपवून विठ्ठल परतला होता. रात्रपाळीमुळे त्याचे डोळे तारवटले होते. पुरते उजाडताच ती विठ्ठलला घेऊनच रवीच्या शोधार्थ बाहेर पडली होती. कुठे कुठे हिंडली हे तिच्या फक्त पायांनाच ठाऊक ! गुराच्या लोढण्याप्रमाणे विठ्ठल तिच्या मागोमाग हिंडत होता. दिवसभर पोटात काही नव्हते. अंग कढत झालेले, डोळे तारवटलेले. रस्त्यावरून चालता चालता ती दोघंही एका झाडाखाली थांबली.

"वच्छे .

"काय ?"

"पोर काही हाती लागत नाही आता."

वत्सलेनं त्याच्या डोळ्यांकडे पाहिलं. त्यानं डोळा भिडवला नाही.

ती एकदम किंचाळली : " सापडला . . . सापडला ! "

त्याचा हात हातात गच्च पकडून ती सुसाट धावत सुटली. पोलीस चौकीत पोहोचेपर्यंत.

पुढे काय झाले तिचे तिलाच ठाऊक नव्हते.

वत्सला पुनः पुनः आठवण्याचा प्रयत्न करू लागली. दुसऱ्या दिवशी काय झाले . . . तिसऱ्या दिवशी . . . चौथ्या दिवशी . . .

तिच्या डोळ्यापुढे अंधेरी आली. हे सारं सांगायचं का कोर्टात ? शपथेवर ? ईश्वर साक्ष ?

खरंच सांग का ? का नको ?

वच्छे, अजून संभ्रम ?

दोनच दिवसांपूर्वी तिची वहीण येऊन भेटून गेली होती. कित्येक वर्षांनंतर !

त्यावेळी ती निर्भत्सना करायला आली होती.

आता सांत्वन करायला आली होती. थोडा मानभावी उपदेश करायला. "वच्छे, झालं गेलं गंगेला मिळालं एकदा अन्न घालवलीस. आता पुनः कोर्टात कशाला त्याचं पुराण वाचतेस ? पुनः नको त्या आठवणी. नको लोकांमध्ये चर्चा. आम्ही पुनः मान खाली घालून वागायचं "

वत्सलेने कोरड्या नजरेनं उत्तर दिलं होतं :

"ताई, ताई अन्नूची मला भीती वाटत नाही. मला रवीची भीती वाटते. त्या अजाण निष्पाप पोरापुढे मी नागवी झाले होते आता "

रवीचा चेहेरा रडवेला, रुसलेला . . समजूत घालताच खिन्नपणे हंसणारा . . .

"बाई तुम्हाला पुकारताहेत." दारात कॉन्स्टेबल उभा होता. उरातून निघालेला हुंदका वत्सलेने कष्टाने परतवला. खुर्ची सरकवून ती उठली. न्यायमंदिरात जाण्यासाठी दिन खोलीबाहेर पाऊल टाकले !

• • •



# 'अमला'स दिसलेले गांधीजी

*गांधीजींच्या उपोषण-काळात 'बा'च्या साहाय्याला मी, कु. मीरा स्लेड, सौ. प्रभावती जयप्रकाश व एक मुस्लिम युवती अशी सज्ज होतो......*

'एक निर्विवाद थोर पुरुष' म्हणून जगातील सर्व राष्ट्रांनी महात्माजींना एकमुखाने मान्यता दिली आहे. 'मी हिमालयाएवढ्या चुका केल्या आहेत' अशी जरी खुद्द महात्माजींनीच स्वमुखाने कबुली दिली असली तरी त्यामुळे त्यांच्या लोकोत्तरत्वाला मुळीच बाध येत नाही. महात्माजींचे चाहते, मित्र नि भक्त जगात सर्वत्र आहेत. पश्चिम जर्मनीत त्यांच्या अनेक भक्तांपैकी डॉ. मार्गारेट स्पिजेल् या एक प्राध्यापिकाही आहेत. या बाईंना १९३२ मध्ये महात्माजींचा काही काळ प्रत्यक्ष सहवासही घडला होता. महात्माजींच्या अहमदाबादजवळील साबरमती आश्रमात तसेच वर्ध्याच्या सेवाग्राम आश्रमातही हरिजनोद्धाराचे प्रत्यक्ष कार्य या बाईंनी केलेले आहे. बर्लिनमधील एका कॉलेजात त्या इंग्रजीच्या प्राध्यापिका होत्या. महात्माजी त्यांना आपल्या मुलीप्रमाणे मानीत नि 'अमला' या नांवाने संबोधीत. महात्माजींच्या सहवासात काही काळ काढल्यामुळे आणि त्यांच्या आश्रमात राहून काही लोकोद्धाराचे कार्यही केल्यामुळे महात्माजींचे त्यांना सम्यक् दर्शन झाले होते. या दर्शनामधून त्यांनी गांधीजींबद्दलच्या काही हृद्य, उद्बोधक नि मनोरंजक आठवणी लिहून काढल्या आहेत. त्यातून महात्माजींबद्दलची त्यांची भक्ती, श्रद्धा नि त्यांना आलेल्या निर्घृण मृत्यूबद्दल वाटलेली हळहळ व्यक्त होते. या आठवणींमधून स्पिजेल् बाईंना वाटलेल्या महात्माजींबद्दलच्या निस्सीम निष्ठेचा एक अखंड धागा स्वच्छपणे दृग्गोचर होतो.

महात्माजींबद्दल सर्व जगात आजपर्यंत खूपच चांगले लिहिले गेले आहे; बोलले गेले आहे. तथापि स्पिजेल् बाईंच्या आठवणीतली आत्मीयता नि भक्तीचा ओलावा आगळाच सौंदर्याने नि सुहृदतेने विनटलेला आहे. एखाद्या पित्याची लाडकी कन्याच जणु आपल्या पित्याबद्दल बोलत आहे असा भास होण्याइतक्या या आठवणी मार्दवाने नि सहृदतेने भरल्या आहेत.

'अमला' या गोड नांवाने महात्माजी या प्राध्यापिकेस जसे संबोधीत तसेच त्याही गांधीजींना 'बापू' या भारतीयांना प्यार असलेल्या नांवाने संबोधताना दिसतात.

## भारताबद्दलची ओढ

डॉ. मार्गारेट स्पिजेल् लिहितात, "मी १९३२ मध्ये बर्लिनमधील एका कॉलेजात वरच्या वर्गात इंग्रजी शिकवीत असे. याकरिता टेक्स्टबुक म्हणून मी "महात्मा गांधी" या पुस्तकाची निवड केली होती. हे पुस्तक म्हणजे दुसरे-तिसरे काही नसून, डॉ. जट्टा टायडेमन् यांनी महात्माजींच्या "यंग इंडिया" या नियतकालिकामधून संकलित केलेले निवडक उतारेच होते. १९३२ मध्येच स्वखर्चाने मला भार-

ताचा प्रवास करण्याकरिता शासनाने तीन महिने रजा दिली. मला गांधीजींना भेटायचे होते नि त्यांच्या तत्त्वप्रणालीची नि समस्यांची ओळख करुन घ्यायची होती. गांधीजी म्हणजे आहे तरी कशी व्यक्ती, हेही पहायचे होते. त्यांच्याबद्दल मी खूपच ऐकले होते; वाचले होते. आपल्या अति साध्या जीवन पद्धतीने नि राजकीय आणि अध्यात्मिक तत्त्वांमुळे त्यांचा सभोवतालच्या चराचर सृष्टीवर, आपल्या अनुयायांवर नि एकंदर सर्व भारतीयांवर केवढा प्रचंड प्रभाव पडला होता, हे मला माहीत होते.

बाळपणापासूनच मला भारतात प्रचलीत असलेल्या निरनिराळ्या धर्मांबद्दल एक विशिष्ट प्रकारची ओढ होती. तथापि, त्या सर्वांपेक्षाही महात्माजींच्या अहिंसा धर्माबद्दल अधिक ओढा होता. माझ्या दृष्टीने महात्माजी म्हणजे अहिंसेचे एक प्रणेतेच होते. भारतात आल्यावर मी गांधीजींच्या अहमदाबादजवळील साबरमती आश्रमात पाहुणी म्हणून उतरले. महात्माजींच्या पुतण्याने त्यांच्या तत्त्वप्रणालीनुसार या आश्रमाची व्यवस्था ठेवली होती. आश्रमातल्या सर्व दैनंदिन जीवनक्रमात मी सहभागी झाले होते. कपडे धुणे, भांडीकुंडी साफ विसळणे, खेड्यापाड्यातील रस्त्यांची साफसफाई करणे, इत्यादि सर्व कामे यात येत. तथापि, टकळीवर सूत कातणे मला जमत नसे. मला महात्माजींची प्रत्यक्ष भेट घ्यायची होती. ते त्यावेळी पुण्यास स्थानबद्ध होते. त्यांच्या पुतण्याने मला आपले एक ओळखपत्र दिले. स्थानबद्धतेतसुद्धा बाहेरील पाहुण्यांची भेट घेण्याची महात्माजींना अनुमति होती. अर्थात् अशा इच्छुकांना त्यांना तुरुंगातच भेटावे लागत होते. महात्माजी त्यांना प्रेमाने भेटत. त्यांच्या अनेक ध्येयात अस्पृश्यता-निवारणाला महत्त्वाचे स्थान असे. मी थोडे दिवस साबरमती आश्रमात काम केले असल्याने नि त्यांच्या पुतण्याने त्यांना देण्याकरिता दिलेले ओळखपत्र माझ्याजवळ असल्याने महात्माजींनी माझे मोठ्या प्रेमाने स्वागत केले.

येरवड्याच्या त्या विस्तीर्ण तुरुंगाच्या आवारातील एका विशाल आम्रवृक्षाखाली त्यावेळी ते बसले होते. त्यांच्या भोवती त्यांना भेटावयास आलेल्या स्त्री-पुरुषांची एकच गर्दी उसळलेली मी पाहिली. त्या देखाव्यावरून खऱ्या अर्थाने थोर असणाऱ्या पुरुषश्रेष्ठाच्या अध्यात्मिक प्रभावाची काय जादू असू शकते हेही मला कळले. महात्माजी स्थानबद्ध होते. तथापि, स्थानबद्धतेतले महात्माजी मला मात्र त्या बद्धस्थानाचे सम्राटच वाटले; अधिपती वाटले. तुरुंगाचे अधिकारी त्यांच्यापुढे नतमस्तक होत. महात्माजींना पहाताच मला येशूची नि सॉक्रेटीसची आठवण झाली. त्यावेळचे त्यांचे प्रथम दर्शन ही माझ्या जीवनातली मोठी भावोत्कट आठवण आहे, अविस्मरणीय स्मृती आहे.

"तू सूत काततेस की दोरखंड विणतेस ?" टकळीवर कापसापासून ओबडधोबड धागा काढताना मला महात्माजी विचारायचे. महात्माजींची जेवणाची भांडीकुंडी मी घासूनपुसून स्वच्छ ठेवीत असे. प्रवासात गैरसोयीचे नि अशक्य असल्याने मी शाकाहारी जेवण सोडन दिल्याचे त्यांच्या कानावर जेव्हा गेले तेव्हा त्यांनी माझी किती कानउघाडणी केली! शाकाहाराची महति त्यांनी मला पटवून दिली नि तेव्हापासून मी कायमचीच शाकाहारी बनले. जर्मनीस परतण्यापूर्वी त्यांचे नि माझे निरोपाचे बोलणे झाले तेव्हा सद्गदित स्वरात ते म्हणाले, "अधूनमधून पत्र लिहीत जा मला. शक्य झाल्यास पुन्हा माझ्या भारतात अवश्य ये आणि मला भेट !

जर्मनीस परत जाताना बोटीवरुन मी महात्माजींना तीन पत्रे लिहिली. बर्लिनला पोहोचल्यानंतर दर आठवड्यास एक पत्र मी त्यांना टाकीत असे. माझ्या प्रत्येक पत्राला त्यांच्याकडून आवर्जून उत्तर येई. १९३३ च्या जनेवारी ते मार्चच्या तीन महिन्याच्या काळात मला त्यांची दहा पत्रे आली. ती त्यांनी स्थानबद्धतेत असताना लिहिलेली होती. त्यांचे पहिलेच पत्र फार सुंदर नि भावनोत्कटतेने भरलेले होते.

येरवडा कारागृह : दि. १२ जनेवारी, १९३३

"अमलास,

बोटीवरून तू लिहिलेले पत्र पोहोचले. माझ्या आश्रमात तू राहिलीस आणि हरिजनोद्धाराच्या कार्यात प्रत्यक्ष सहभागी झालीस याचा मला फार आनंद झाला. माझ्या दलितांची तू जी निःस्वार्थीपणाने सेवा केलीस त्यामुळे तू मानवतेचीच एक प्रकारे सेवा केल्यासारखे आहे. तू टकळीवर 'दोरखंड' विणण्याचे सोडून दिलेस हे एका दृष्टीने योग्य केलेस. उत्तमपैकी सूत कातण्याची कला तुला जर अवगत झाली असती तर, कापसापासूनच काय, पण



मी तुला लोकरीपासूनही तलम धागा काढण्यास सांगितले असते. आपल्यास तू माझी मुलगी म्हणून मानीत असशील तर पुन्हा जेव्हा आपली भेट होईल तेव्हा माझी भीती बाळगण्याचे तुला कारणच नाही. जेव्हा तुझ्या मनात येईल तेव्हा मला पत्र लिहिण्याची टाळाटाळ करू नकोस. महादेवभाईनी (देसाई) तुला आशीर्वाद सांगितले आहेत. माझेही आशीर्वाद !

तुझा,
बापू"

## गांधीजींच्या सहवासात

मी जातीने ज्यू असल्यामुळे, हिटलरचा उदय झाल्यावर, त्याच्या नॅशनल सोशालिस्ट शासनाने १ एप्रिल १९३३ रोजी मला माझ्या कॉलेजमधील पदावरून काढून टाकले. त्यानंतर मी व्हेनिसला गेले नि तेथून सुदैवाने मजजवळ पासपोर्ट असल्याने, मी मुंबईला आले. त्याच दिवशी मी गाडीने पुण्यास गेले. बापूजी अद्यापपर्यंत पुण्यास येरवडा तुरुंगात स्थानबद्धच होते. मी त्यांची पुन्हा भेट घेतली तेव्हाही ते तुरुंगाच्या आवारातील आम्रवृक्षाखालीच बसलेले मला दिसले. मी त्यांना म्हटले, "मला आपल्या आश्रमाचे कायम सदस्य व्हायचे आहे. येथील जीवनक्रमाच्या सर्व शपथा घ्यायच्या आहेत. मला अस्सल भारतीय स्त्री बनायचे आहे नि भारतीय स्त्रीचेच

एखादे नांव लावायचे आहे." बापूजींनी माझ्या विनंतीला संमती दिली. साधेसुधे दरिद्री नारायणाचे जीवन जगणे ही आश्रमाची एक प्रमुख आज्ञाच असल्याने बापूजींनी माझ्याजवळचे सर्व पैसे नि माझा सोन्याचा कंठाही काढून घेतला. ते म्हणाले, "येथील शपथा वगैरे तू मायाहून घेशीलच. मी तुला एक अस्सल भारतीय स्त्रीचे नांव देतो." तेव्हापासून मी 'अमला' झाले. बापूजी म्हणायचे, अमला म्हणजे विशुद्ध मनाची, मलविरहीत, अवस्था; विकार-मुक्तता !

एका पंधरवड्यात मला बापूजींना कारागृहात सतत भेटण्याची परवानगी मिळाली नि सकाळपासून संध्याकाळपर्यंत मी त्यांच्या सहवासात राहू लागले. १९३३ च्या मे महिन्यापासून १९३४ च्या नोव्हेंबरपर्यंत मी साबरमती नि वर्ध्याच्या आश्रमात कार्य केले. आश्रमातील दैनंदिन जीवनक्रमाबरोबरच मी तेथील आश्रमवासीयांना इंग्रजी शिकवीत असे आणि तसेच हिंदी नि गुजराती भाषा शिकत असे.

महात्माजींच्या आश्रमातील अनुयायांची, त्यांच्या करता, आयुष्यभर कारावास भोगण्याचीही तयारी असे. लहान मुले, पुरुष व स्त्रिया मिळून आश्रमात तीनशेजण रहात होते. हे एक कुटुंबच बनले होते. त्यात हिंदूंबरोबरच मुसलमान व बौद्धही होते. आश्रमाच्या कडक शिस्तीनुसार पहाटे ४ वाजताच दिनचर्या सुरू होत असे. पहाटे ५ वाजेपर्यंत सर्व धर्मांच्या प्रार्थना होत. याचे एक कारण असे होते की, सर्व धर्म समान असून त्यांची शिकवणही एकच आहे, अशी एक आश्रमाची शपथ महात्माजींनी घालून दिलेली असे. मनाने नि वृत्तीने मी जरी धार्मिकतेकडे कल असणारी नव्हते तरी आश्रमातल्या सर्व-धर्मीय प्रार्थना मला फार आवडत नि त्यातील ईश्वरविषयक भावना माझ्या हृदयास भिडत. ही एक नवीनच अनुभूति मला येत होती. दररोज सकाळी नि संध्याकाळी आश्रमाज्ञांचा मुखातून पुनरुच्चार करावा लागे. अहिंसा, सत्याचरण, दरिद्री नारायणाची उपासना, मनाची शुद्धता नि पावित्र्य,




शी : ! इतकी कुरुप बाई जन्मात पाहिली नव्हती, माकड मेलं !

शारीरिक श्रम, जिभेचे चोचले म्हणून नव्हे तर केवळ शरीर जगविण्याकरताच आवश्यक असलेल्या अन्नाचा आहार, सर्व धर्मांची समानता, स्वदेशीचे व्रत, निर्भीडपणा व निर्भयता आणि अस्पृश्यता-निवारण अशा 'आज्ञां'चे कडक पालन ही आश्रमाची शिस्त असे.

### भोजन नव्हे, यज्ञकर्म

सायंकाळी पाऊण तास पुन्हा प्रार्थना असायच्या नि रात्री आठनंतर आश्रमात सामसूम व्हायची. निसर्गाच्या सान्निध्यात रहाण्याची नि साधासुधा पण अत्यावश्यक तेवढाच पौष्टिक आहार घेण्याची महति महात्माजी वरचेवर सांगत. मसाल्याचे पदार्थ, भात, डाळी आणि चहा इत्यादींना फाटा असे. कच्चे अन्न नि कच्च्या भाज्या खाण्याचे ते नेहमी प्रयोग करीत. या सर्वांत जिभेचे चोचले म्हणून मिष्टान्नावर असलेले बंधन पाळणे महाकठीण होते. तथापि, अंडी सोडल्यास, या शिस्तीचे मी काटेकोर पालन करण्याची शिकस्त करीत असे.

आश्रमातील दैनंदिन कार्यक्रमामध्ये स्वतःचे कपडे स्वतःच धुणे आणि खेड्यापाड्यातील रस्त्यांची साफसफाई यांना अग्रक्रम असे. अस्पृश्यता निवारण्याच्या दृष्टीने या कार्यक्रमांना महत्त्व होते. सर्वच आश्रमवासीयांची वस्त्रे निर्भेळ खादीची असत. त्यामुळे चकतीवर किंवा टकळीवर सूत कातणे हा एक प्रमुख नि अपरिहार्य असा कार्यक्रम असायचा. जुन्या पारंपारिक पद्धतीने सर्वच गृहकृत्ये करावी लागायची. त्यामुळे वेळ फार जायचा. खोल विहिरीतून पाणी काढून आणावे लागे. जात्यावरच धान्य दळावे लागे. दरिद्री-नारायणाच्या व्रतामुळे आश्रमात सुबक व सुंदर फर्निचर कधीच नसायचे. जमिनीवरच पथारी पसरून बसावे व निजावे लागे. लहान मुलेही या सर्व कार्यक्रमात सहभागी व्हायची.

१९३३ च्या जुलैमध्ये आश्रम बंद करण्याकरिता बापूजी अहमदाबादला आले. एकाएकी असे काय घडले होते ? दास्यशृंखलातून भारत मुक्त होऊन स्वतंत्र झाल्याखेरीज आश्रमातही न रहाण्याची बापूजींनी शपथ घेतली होती. तीनुसार ते 'आश्रमात' न रहाता 'आश्रमाशेजारीच' राहात आणि सबंध दिवस तेथेच वावर करीत. सकाळ-संध्याकाळी ते आश्रमातील रुग्णांची विचारपूस करीत असत. ब्रिटीश शासनाविरुद्ध त्यांनी असहकाराच्या चळवळीची योजना आखली होती. ते तेवढ्याकरिता अनुयायी तयार करीत होते. ज्या मुलांना आणि स्त्रियांना या असहकाराच्या चळवळीत सहभागी व्हायची इच्छा नव्हती त्याची त्यांनी वर्ध्याच्या सेवाग्राम आश्रमात रवानगीही केली. अशा रवानगी केलेल्यांमध्ये मीही होते. शासनाच्या ताब्यात आश्रम देण्याची त्यांची इच्छा होती. पण शासनानेच ते नाकारल्यामुळे त्यांनी आश्रमाची व्यवस्था 'हरिजन सेवक संघा'कडे सुपूर्त केली. आजतागायत या 'हरिजन सेवक संघा'-कडेच आश्रमांची मालकी आहे. हे करण्यात बापूजींचा फार मोठा त्याग होता. आपले आश्रम ही त्यांना अभिमानाची बाब वाटायची. ते जिथे जिथे जात नि राहात, तिथे त्यांच्या भोवती भराभर माणसे

गोळा होत नि त्यांचे अनुयायित्व पत्करीत. अशा रीतीने ठिकठिकाणी नवे नवे आश्रमच जणु निर्माण होत. सर्वच आश्रमवासीयांवर बापूजी आपल्या मुलांप्रमाणे प्रेम करीत आणि सर्वजण त्यांच्याकडे पितृत्वाच्या भावनेने बघत; त्यांच्या भोवती 'बापू बापू' म्हणून रुंजी घालीत.

१ ऑगस्ट १९३३ या दिवशी बापूजींची, बांची (कस्तुरबा) आणि इतर अनुयायांची धरपकड झाली. याची कल्पना नसल्यामुळे, निषेध म्हणून, बापूजींनी आमरण प्रायोपवेशन सुरू केले. याची परिणती कदाचित् फार भीषण घटनेत होईल या भीतीने शासनाने बापूजींची सुटका केली. याबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्याकरिता बापूजींनी सत्याग्रहाची कल्पना सोडून दिली आणि एक वर्षभर हरिजनोद्धाराचे कार्य करण्याकरिता सर्व भारतभर दौरा काढण्याचे ठरविले. त्यानुसार प्रत्यक्ष दौराही सुरू केला. दररोज सकाळी नि संध्याकाळी हरिजन वस्तीला भेट देण्याचे नि आपले अनुयायी व त्यांची मुले बरोबर घेऊन फेरफटका मारण्याचा क्रम त्यांनी सुरू केला. अशा फेरफटक्यांचे वेळी बापूजींच्या हरिजनोद्धाराच्या कल्पना, विचार आणि त्यांच्या समस्या जाणून घेण्याचा मी प्रयत्न करीत असे. पण हरिजनांच्या वास्तववादी दैनंदिन जीवनापलिकडे ते इतर गोष्टींवर भर देत नसत. औषधोपचार आणि रुग्णसेवा यात त्यांना आनंद वाटे. निसर्गोपचार पद्धतीवरच त्यांचा दांडगा विश्वास होता नि याच पद्धतीनुसार ते रुग्णांची सेवा स्वतःच करीत असत. आपण डॉक्टर व्हायचे, असे एक त्यांचे बाळपणीचे स्वप्न होते. तथापि, शरीरविच्छेदनावर त्यांचा विश्वास नसल्याने या व्यवसायाविरुद्ध त्यांचे मन बंड करून उठले आणि त्यांनी तो विषय डोक्यातून काढून टाकला. ज्या निसर्गाने माणसास जन्म दिला तोच त्यास व्याधीमुक्त करील ही त्यांची श्रद्धा होती. त्यांच्या हरिजनोद्धाराच्या सबंध दौऱ्यात, त्यांची एक सहकारी म्हणून, मी त्यांच्याबरोबर वावरले. या निमित्ताने मी कानपूर ते बनारसपर्यंत त्यांच्याबरोबर हिंडले. आम्ही नेहमी रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यातूनच प्रवास करायचो. त्यांच्या दर्शनाकरता रेल्वेच्या प्रत्येक स्थानकावर प्रचंड गर्दी उसळायची. ही संधी साधून बापूजी त्यांच्याकडून, हरिजनांकरिता, रोकड पैसे नि जवाहीर-दागदागिने गोळा करीत. फार दूरवरून, अगदी दूरवरच्या खेड्यापाड्यातूनही, लोक त्यांच्या दर्शनास येत असत. अशा वेळी बापूजींना त्रास होऊ नये नि त्यांच्या विश्रांतीत–झोपेत व्यत्यय येऊ नये याची काळजी घेण्याचे काम माझ्याकडे होते. मी ते मोठ्या आनंदाने करीत असे.

बनारस येथील आमच्या वास्तव्यात आम्ही 'काशी विद्यापीठात' रहात असू. या विद्यापीठाचा सर्व कारभार महात्माजींच्या विद्यादानाच्या तत्त्वांनुसार चालत असे. भारताचे लाडके पंतप्रधान कै. लालबहादुर शास्त्री याच विद्यापीठाचे एक नामवंत स्नातक होते. हरिजनांच्या उन्नतीचे महात्माजींचे ध्येय असल्यामुळे आणि हिंदुधर्मातील रूढीप्रणीत कडव्या सनातनीपणाशी त्यांचे ध्येय मिळते-जुळते नसल्यामुळे, बनारसमधील धार्मिक वातावरणाबद्दल नि तिथल्या सनातनी धार्मिक संस्थांबद्दल त्यांना विशेष ओढ नि आस्था नव्हती. त्यामुळे आपल्या अंगिकारलेल्या कार्याव्यतिरिक्त जाऊन काशीमधील इतर काही धार्मिक स्थळे पहाण्याच्या ते भानगडीत पडत नसत. त्यांच्या दृष्टीने काशी म्हणजे कडव्या हिंदु सनातनीपणाचे एक पवित्र पीठच होते. मी मात्र बनारसमध्ये सर्वत्र हिंडून तिथली सर्व धार्मिक स्थळे पहात असे. या पूर्वीही मी एकदा बनारसला येऊन गेले होते.

## उपोषण कालात सेवा

हरिजनोद्धाराचा हा वर्षाचा दौरा संपल्यानंतर महात्माजींनी वर्ध्याच्या सेवाग्राम आश्रमात वास्तव्य करून उपवास सुरू केला. मी त्यांच्याबरोबरच त्यांच्या आश्रमातील खोलीत रहात असे, नि त्यांची सेवा करीत असे. त्यांची सेवा करणाऱ्यात, माझ्या व्यतिरिक्त, बा (कस्तुरबा), आदि अनेक जवळच्या व्यक्ति होत्या.

भारताच्या स्वातंत्र्याकरिता महात्माजींनी आपले जीवनसर्वस्व भारतीय जनतेच्या चरणी वाहिले होते; सर्वस्व देशाला अर्पिले होते. आपला देह कणाकणाने त्याकरिता झिजविला. तथापि, ज्या स्वातंत्र्याकरता ते बलाढ्य अशा इंग्रजी सत्तेशी लढले ते स्वातंत्र्य उंबरठ्याशी आल्यानंतर मात्र ते विद्ध झाले; व्यथित झाले; मनाने खचले. मिळालेल्या स्वातंत्र्याचे स्वरूप त्यांच्या मनाजोगते नव्हते. 'भारताचे तुकडे होण्याआधी माझ्या देहाचे विभाजन प्रथम होईल' या आपल्या भीष्मप्रतिज्ञेची परिणती इतक्या क्रूरतेने व्हावी नि उघड्या डोळ्यांनी ती आपणाला बघावी लागावी, या दारुण वंचनेचे शल्य त्यांच्या विदीर्ण झालेल्या हृदयात जाऊन बसले. ते भारताच्या विभाजनाविरुद्ध होते. त्यामुळे आपल्या डोळ्यादेखत भारत दास्यमुक्त झालेला पाहिल्यामुळे जो काही थोडासा आनंद त्यांना झाला तो निर्भेळ नव्हता. त्यात व्यथेची ठुसठुशी होती. ध्येयसिद्धीच्या असफलतेचा मिठाचा खडा त्यात पडून त्यांच्या आनंदाला खिन्नतेची बारीकशी किनार प्राप्त झाली होती. विभाजनानंतर झालेल्या जातीय दंगली, कत्तली नि रक्तपाताचे वेळी जातीय सलोखा प्रस्थापित करण्याकरिता आणि भारताचे निधर्मीयत्व अबाधित राखण्यासाठी त्यांनी आपल्या सर्व शक्ती पणास लावल्या. हे सहन न झाल्यामुळेच कुठल्याशा एका माथेफिरूने अमानुष शक्तीने एका सायंप्रार्थनेपूर्वी दिल्लीत त्यांचा निर्घृण बळी घेतला.

त्यानंतर मात्र सर्व भारत बापूजींकरिता हळहळला; ढळढळा रडला. होय! 'बापूजीं'करताच! माझ्या 'बापूजीं'करताच साऱ्या विश्वाने अश्रू ढाळले!

बापूजी! किती वात्सल्यपूर्ण नांव! याच नांवाने बापूजी आजही सर्व जगात जणु जिवंतपणेच वावर करताहेत! हेच नांव जगाच्या कानाकोपऱ्यात दुमदुमत आहे नि उद्याही राहील. खरोखरच, बापूजी सर्व भारतीयांचे पिताजीच नव्हते का? धर्मांधर्मांच्या, त्यातील कडव्या सोवळेपणाच्या नि सनातनीत्वाच्या तटबंदीच्या दगडा-दगडातूनही अजून 'बापूजी' हेच नांव घुमत नाही का

• • •



— अरविंद ताटके

लावण्यवती राजकन्या संयोगिता सुगंधी पाण्याच्या हौदात स्नान करण्यात रमली होती अन् जवळच तिची आवडती दासी कर्नाटकी तिचं रूप कुतुहलतेनं पहात उभी होती.

संयोगिता गोरीपान होती. पण ते गोरेपण नुसतं पांढरंफट-फटीत नव्हतं. त्यावर एक वेगळ्या प्रकारची लाली होती. उंचीनं ती उणीपुरी नसली तरी खुजी खासच नव्हती. शरीरानं ती बांधेसूद असल्यानं तिचं रूप फार उठून दिसे. ती जाड नसली तरी भरदार होती. तिची कांति नितळ होती. पापण्या धनुष्याकृती असून तिच्या डोळ्यात निळसर झाक होती. तिच्या अंगावर फक्त झिरझिरीत असं एकच वस्त्र असल्यानं त्यातून तिचे सारे अवयव स्पष्ट दिसत होते. कर्नाटकीखेरीज बाजूला कुणी नाही याची खात्री असल्यानं ती बेहोषीत निःसंकोचपणं स्नान उरकीत होती. पोसलेल्या पोटऱ्या, पुष्ठ वक्षस्थळं अन् नितंबांच्या गोलाईमुळं भिजलेल्या वस्त्रातून तिचं सारं सौंदर्य अन् तारुण्य खळाळून उठलेलं भासत होतं. तिच्या त्या अनुपम सौंदर्याकडे लोभसपणं कर्नाटकी टक लावून पहात होती. विधात्यानं संयोगितेला इतकं सुंदर कसं घडविलं याचं कोडं तिला पडलं होतं.

एवढ्यात स्नान उरकून अन् कपडे करून आलेल्या संयोगितेनं तिची तंद्री भंग करून म्हटलं—"इतकं निरखन काय पहात होतीस माझ्याकडं?"

"आपलं सौंदर्य."

"कर्नाटकी, आज माझी थट्टा करायचा विचार आहे वाटतं ?"

"थट्टा कशाला करू ? दिसलं ते सांगितलं."

"पुरे पुरे. पण काय ग ! एवढी का मी सुंदर आहे ?"

"हे काय विचारणं झालं ! उगीच का महाराजांनी आपल्या स्वयंवराचा पण लावलाय."

"काय म्हणालीस ? बाबांनी पण लावलाय ?"

"हं. आपल्याला अनुरूप पति नको का मिळायला ? म्हणून त्यांनी स्वयंवरासाठी देशोदेशीच्या राजे-महाराजांना-राजपुत्रांना निमंत्रणं धाडलीयत."

"खरं सांगतेस ?"

"खोटं कशाला बोलू ? पण लग्नानंतर मी आपल्याबरोबरच येणार बरं का !"

"फारच वहावलीस बरं का कर्नाटकी. मी जिथं जाईन तिथं तुला नक्की नेईन; पण एक गुपित सांगू तुला ?"

"सांगा."

"बाबांनी स्वयंवर मांडलंय खरं पण माझं मन दुसरीकडेच अडकलंय !"

"काय म्हणता ? नांव तरी कळू दे !"

"दिल्लीपतींवर माझं मन बसलंय"

"पृथ्वीराज चौहाणांवर की काय ?"

"हं." संयोगिता लाजेनं चूर होऊन बोलली.

"ते कसं शक्य आहे ? एक तर ते आपले मावस काका अन् महाराजांचं तर त्यांच्याशी उघड वैर. पण आपण त्यांना पाहिलंत तरी कुठं ?"

"पहायला कशाला हवं ? सगळीजणं त्यांच्या शौर्याची तारीफ करताहेत."

"पण ते दिसतात कसे ते ठाऊक आहे का आपल्याला ?"

"कर्नाटकी, पुरुषाचं रूप पहायचं नसतं. त्याचा पराक्रम बघायचा असतो. त्यात पुन्हा ते देखणे आहेत."

"ते कसं कळलं आपल्याला ?"

"त्यांचे जिवलग मित्र चांदभाट आले होते इकडे एकदा. त्यांनी बाबांजवळ केलेल्या वर्णनावरून ते नक्कीच सुरेख असले पाहिजेत."

"एकूण पृथ्वीराजना वरलंयत आपण ?"

"हं. निवड चुकली नाही ना ?

"छे छे. पण हे जमायचं कसं हाच प्रश्न आहे."

"तू नाही मला मदत करणार ? तुझं त्यांच्या दरबारी वास्तव्य होतं ना ?"

"होतं ना ! मग मी काय करू आपल्यासाठी ?"

"त्यांना पत्र लिहिशील तू ?

"पृथ्वीराजांना ? आपणच लिहा ना !"

"ना ना. तूच लिही."

"माझ्या पत्राला थोडेच ते धूप घालणार आहेत ?"

"मग कसं करायचं ?"

"मी चांदभाटना पत्र लिहिते अन् घालते सगळं त्यांच्या कानावर. म्हणजे पुढचं सगळं ते पाहून घेतील. त्यांच्यासारखा हुशार माणूस दिल्लीत नाही."

"छान ! लिहीच मग त्यांना पत्र !"

दिल्लीपती पृथ्वीराजचा दरबार संपला होता. सगळी मंडळी गेल्यावर त्यानं चांदभाटला जवळ बोलावून विचारलं–"चांद, विशेष खबर काय आहे ?"

"कनोजच्या जयचंदानं राजसूय यज्ञ आरंभलाय. सगळ्या मांडलीक राजांना त्यानं निमंत्रण धाडलीयत. त्याच वेळी आपल्या मुलीचं स्वयंवरही तो उरकून घेणार आहे. यज्ञासाठी आपल्यालाही बोलावलंय त्यानं."

**....'शाब्बास'... असे शब्द ऐकू येताच त्या आवाजाच्या रोखानं अंध पृथ्वीराजानं डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोच आपल्या आवडत्या धनुष्यावरून एक बाण सोडला आणि ....**

"हं. यज्ञाला मी जाणार नाही. त्याचं सार्वभौमत्व मी मानीन नाही. स्वयंवराशी मला कर्तव्य नाही."

"असं कसं म्हणता महाराज ? स्वयंवरासाठी त्यानं पणही ठेवलाय."

"पण काय आहे ?"

"आपल्या शब्दवेधी धनुर्विद्येचा त्याला भारी हेवा वाटतो. त्यानं दरवाज्यावर आपला (पृथ्वीराजांचा) एक पुतळा करुन त्या पुतळ्याच्या हातात त्यानं धनुष्य ठेवलंय. जो राजपुत्र अगर राजा डोळे बांधून शब्दाच्या रोखानं त्या पुतळ्याच्या हातातलं धनुष्य मोडील त्याला जयचंद आपली मुलगी देणार आहे. आपल्याला द्वारपाल बनवून त्यानं आपली अवहेलना तर केलीच आहे अन् आपल्या या विद्येला शह देण्याचाही त्याचा विचार दिसतोय. पण जिंकून मुलगी मिळविण्यात पुरुषार्थ असतो अन् आपला पराक्रमही सगळ्यांच्या नजरेस पडतो. मग आपला विचार काय आहे ?"

"मला या पणात अजिबात गम्य नाही, चांद.'

"आपला अपमान करणाऱ्याची खोड जिरवून त्याची मुलगी हरण करण्याची धमक आपल्या वाहूत नाही ?"

"तसं नाही चांद ! जयचंद मला शत्रुस्थानी लेखतो. तशात तो माझा मावसभाऊ. म्हणून त्याच्या कन्येशी मला मुळीच कर्तव्य नाही."

"पण तिचं मन आपल्यावर गेलं असलं तर ?"

"काहीतरीच बोलतोयस चांद."

"सत्य सांगतोय महाराज."

"कशावरुन ?"

"तिचं पत्र आलंय तसं मला."

"तिनं लिहिलंय तुला ?"

"नाही. तिची दासी कर्नाटकी हिनं मला लिहिलंय तसं."

"आपल्याकडे पूर्वी होती तीच का ही ?"

"हो."

"काय म्हणतेय कर्नाटकी ?"

"संयोगितेची मनोव्यथा व्यक्त केलीय तिनं पत्रात !"

"पण स्वयंवराचं निमंत्रण मला कुठंय ?"

"तिच्या मुलीनं दिलंय ना पण !"

"चावट आहेस तू फार चांद."

"सारं जगच चावट आहे. म्हणून तर माणसं जन्माला येतात."

"खरंच. पण तू येणार ना माझ्याबरोबर ?"

"अवश्य. आपण तिथं मी असणारच."

"पण जयचंद मला ओळखेल की !"

"यज्ञाला आशीर्वाद देण्याच्या निमित्तानं आपण जाऊ. आपण वेषांतर करा. माझ्या येण्यानं जयचंदला आनंदच वाटेल. माझ्या कवितेवर तो खूष असतो."

"होऊं दे तुझ्या मनासारखं"

"का ? पणासाठी आपले वाहू नाही फुरफुरतं ?"

"फुरफुरताहेत रे ! पण पणासाठी नव्हे. संयोगितेला मिठीत घेण्यासाठी."

"वा. महाराजही चावटपणानं बोलू लागले की !"

"तुझ्या सहवासाचा परिणाम आहे तो !"

"तसं म्हणा हवं तर. मग लिहू कर्नाटकीला ?"

"नको. पत्र हेरांच्या हाती पडण्याची शक्यता आहे. आपण समक्षच जाऊ तेव्हा तू सांग तिला."

"जशी आपली आज्ञा. माझ्या मनातलंच बोललात !"

* *

राजसूय यज्ञाचा समारंभ संपल्यावर संयोगितेच्या स्वयंवराची एकच धूम उडाली होती. यज्ञाला पृथ्वीराज आला नाही म्हणून जयचंद संतप्त होता. भटजीच्या वेषातल्या पृथ्वीराज–चांदभाटला तो ओळखू शकला नाही. अनेक छोटे-मोठे सरदार–राजे महाराज स्वयंवरासाठी कनोजच्या राजधानीत येत होते. सगळ्यांची सोय जयचंदानं आपल्या भव्य राजवाड्यात केली होती. सगळ्यांची व्यवस्था त्यानं मोठ्या इतमामानं ठेवली होती. गोरज मुहूर्ताच्या आधी तीन तास पणाचा कार्यक्रम उरकण्याचा त्याचा विचार होता.

दोनप्रहर टळली तरी संयोगितेनं जेवण उरकलं नव्हतं. चांदभाटाचं उत्तर न आल्यानं ती फार उदास होती. कर्नाटकीही तिच्या मन:स्थितीनं गोंधळली होती. तेवढ्यात संयोगिता तिला म्हणाली–



पृथ्वीवरच्या प्राण्यांच्या नजरेस न पडता परत यायचे असल्यामुळे पृथ्वी–प्राणी दृष्टीस पडले नाहीत, त्यांची काही पोर्ट्रेटस् आणली आहेत, त्यावरून काही कल्पना येईल !

"चांदभाटांचं पत्र कसं नाही आलं अजून ? का दिल्लीपतींचं मनच नाही माझ्यावर ? दुसरं कुणाला वरण्याची माझी मुळीच इच्छा नाही अन् बाबा तर पण मांडून बसलेयत."

"बाबांच्या कानावर कां नाही घालीत आपण ?"

"छे बाई. बाबा नुसता रुद्रावतार धारण करतील ऐकल्यावर. पण एक काम करशील ?"

"सांगा."

"वेष पालटून तरी दिल्लीपती स्वयंवरासाठी खास येतील असं माझं मन सांगतेय. तेव्हा तू पुरुष वेष धारण कर अन् सावधतेनं, राजे-महाराजे उतरले आहेत त्या दालनात डोकावून ये. त तिथं असले तर चांदभाट त्यांच्याबरोबर असतीलच. मग पत्राचा जबाब ते तुला समक्षच देतील. पळ आता. वेळ अगदी थोडा राहिलाय."

"चांगली युक्ती काढलीत. मी जाऊन येते आत्ता."

* *

पणाच्या कार्यक्रमाला आता अवघा तासच उरला होता. सगळे राजे-महाराजे पोशाख घालून सज्ज होते. कर्नाटकी तिथं पुरुषवेषात आली त्याचा कुणाला पत्ताही नव्हता. उलट हा खुबसूरत सरदार मध्येच कुठं उपटला याचीच रुखरुख प्रत्येकाच्या चेहेऱ्यावर दिसत होती. कर्नाटकी एक-एक दालन ओलांडीत चालली होती; पण पृथ्वीराज अगर चांदभाट तिला कुठंच दिसेनात. अखेरीस तिनं शेवटच्या दालनात पाऊल टाकलं. तोच तिचा चेहरा आनंदानं फुलून निघाला. कारण तिथं चांदभाट उभा होता अन् उंच तख्तपोशीवर वेषधारी पृथ्वीराज बसलेला तिनं पाहिला. त्याची दाढी पाहून तिला गंमत वाटली अन् ती खुदकन् हसलीही. त्याचं वेषांतर मात्र बेमालूम असल्याचं तिच्या ध्यानी आलं. तरातरा ती चांदभाटापाशी आली अन् बोलली–"आपल्या महाराजांचा काहीच कसा जबाब आला नाही ?"

चांदभाट प्रथम थोडा गोंधळला. पण नाजूक आवाजावरून अन् एकंदर चर्येवरून प्रश्न विचारणारी व्यक्ती कर्नाटकीच असली पाहिजे अशी त्याची खात्री झाली; पण तो फार हुषार होता. चतुरपणं तो तिला म्हणाला–

"'पृथ्वी'चे सगळे 'राजे' इथं जमलेत. तुला कुठला महाराज हवाय ?"

"कुठल्या धर्मग्रंथाशी आपल्या महाराजांचा 'संयोग' असतो ?" कर्नाटकीनं मोठ्या चतुराईनं प्रश्न केला.

"गीतेशी. ती त्यांना फार प्रिय आहे."

"चांदभाट, मला पाहिजे तो जबाब मिळाला."

"कर्नाटकी, तू मला कसं ओळखलंस ?" चांदभाटानं विचारलं.

"जसं आपण मला ओळखलंत तसं. पूर्वी मी दिल्ली दरबारी होते."

"माझ्या लक्षात आहे ते. जबाब लेखी मुद्दामच धाडला नाही. हेरानं लखोटा गडप केला असता तर सगळंच बिघडलं असतं. पुढील गोष्टीत प्रत्येक बाबतीत तुझं साहाय्य मात्र आम्हाला मिळालं पाहिजे. पृथ्वीराजाचा रुकार संयोगितेला कळव."

"कळवते. माझ्याकडून सगळं साहाय्य मिळेलच आपल्याला."

"आता माझी मोठी काळजी दूर झाली कर्नाटकी. आता तू जाऊ शकतेस." एवढं बोलून चांदभाट पृथ्वीराजकडं वळला अन् कर्नाटकी संयोगितेकडं निघाली.

बराच वेळ झाला तरी कर्नाटकी परत आली नाही म्हणून संयोगिता सचिंत होती. तिला पहाताच तिनं उत्सुकतेनं विचारलं—

"काय झालं कर्नाटकी ?"

"पृथ्वीराज आपल्या मित्रासह आले आहेत अन् त्यांची आपल्या विचाराला संमती आहे." सगळा वृत्तांत तिला कर्नाटकीकडून समजला तेव्हा ती सुखावली. तिची काळजी दूर झाली.

जयचंदाचा दरबार काठोकाठ भरला होता. सरदार, राजे-महाराजे सगळे दाटीवाटीनं बसले होते. बाहेर विस्तीर्ण मंडप घातलेला असून तिथं नगरवासीय मंडळी होती. सारे कनोज शहर ह्या अपूर्व कार्यक्रम पहाण्यास लोटलं होतं. दरबारच्या दरवाज्यावर पृथ्वीराजाचा पुतळा असून त्याच्या हातात धनुष्य ठेवलं होतं. या सगळ्या लोकांची गंमत पहात दरबारात वेषधारी पृथ्वीराज अन् चांदभाट बसले होते. जयचंद उठून भाषण करण्यापूर्वीच चांदभाट उठून उभा राहिला. त्यामुळं जयचंद फणफणून बोलला "बरदाई (बैलोबा) तू असा रोड कां दिसतोस रे" त्याचा सवाल ऐकून दरबार तटस्थ झाला. पण चांदभाट काही कमी नव्हता. तो लागलीच म्हणाला—

"दिल्लीपती पृथ्वीराजानं अनेक राजांचा पराभव केल्यानं त्यांनी दाती तृण (गवत) धरलं. त्यामुळं गवताचा सर्वत्र ठणठणाट झाला अन् म्हणून मी रोडावलो" या समर्पक उत्तरानं जयचंद खूष होऊन बोलला— "आपल्यासारखा प्रतिभावान कवि या समारंभास आला म्हणून मला धन्यता वाटतेय, चांदभाट."

"आपल्या कल्पकतेबद्दल मी आपलं अभिनंदन करतो महाराज" चांदभाटानं उत्तर दिलं.

"आज तुम्हाला एक अपूर्व कार्यक्रम पहावयास मिळेल चांदभाट."

"हो. माझ्या धन्यासारखी अपूर्व धनुर्विद्या कोणाला अवगत आहे ते मला पहायचंच आहे. तसा प्रयोग कुणी केला तर पृथ्वीराज आपलं धनुष्य कायमचं खाली ठेवील महाराज."

"चांदभाट, आता घोडंमैदान जवळच आहे. तुझ्या धन्याच्या दर्पोक्तीला परस्पर उत्तर मिळेल आतां."

"तसं झालेलं पहाण्यास मी उत्सुकच आहे" नंतर जयचंद सगळ्यांना उद्देशून बोलला—

"पृथ्वीराज माझा शत्रू आहे ते आपल्याला ठाऊकच आहे. त्याच्या धनुर्विद्येच्या निपुणत्वाला शह देण्यासाठीच हा पण मी ठवला. त्याच्या तोडीचा धनुर्धरच मी जामात म्हणून पसंत करीन. मग तो राजा नसला तरी चालेल. त्यानं डोळे बांधून धनुष्यानं दरवाज्यावर उभारलेल्या पृथ्वीराजाच्या हातातलं धनुष्य मोडलं पाहिजे. शब्दवेधासाठी तोफेचा आवाज काढण्यात येईल. हा पण जिंकणाऱ्याच्या गळ्यात माझी कन्या आनंदानं वरमाला घालील."

पृथ्वीराज ही मजा पहात होता. एक एक धनुर्धर येत होता अन् फजित पावून जात होता. तोफेचे आवाज होत पण प्रयोगात कुणा-लाच यश लाभत नव्हतं. जयचंदाच्या तोंडचं पाणी पळालं. तेव्हा चांदभाट उठून म्हणाला— "राजन् चिंता नसावी. माझ्याबरोबर पृथ्वीराजचा एक शिष्य आलाय. तो पण जिंकून दाखवील. पण त्याला आपण मुलगी दिली पाहिजे."

जयचंद अंमळ घोटाळला; पण लगेच सावरून बोलला— "जयचंद आपला शब्द पाळील, चांदभाट."

"तर मग या शिष्याला पण जिंकण्यास सांगतो."

"बेशक सांगा" जयचंद उसन्या अवसानानं उत्तरला.

दाढीवेषधारी पृथ्वीराजानं डोळे बांधले अन् क्षणार्धात् आपल्या धनुष्यानं पुतळ्याच्या हातातील धनुष्य मोडून पण जिंकला. चांदभाट गरजला— "महाराज, आता वरमाला याच्या गळ्यात पडू दे."

"तसंच होईल चांदभाट" जयचंद निराशेनं बोलला.

आरक्त चेहऱ्यानं संयोगिता हळुहळू दरबारात आली. कर्नाट-कीही बरोबर होतीच. पृथ्वीराजाच्या गळ्यात वरमाला पडल्यावर जयजयकाराच्या गगनभेदी घोषणा दरबारात झाल्या. तेवढ्यात जयचंद चांदभाटला म्हणाला— "आमचा जामात तर अगदी प्रती-पृथ्वीराजच दिसतो."

"अहो हा पृथ्वीराजच आहे" चांदभाट बोलला. जयचंदाचा संशय बळावला. पृथ्वीराजला अटक करण्याचे विचार त्याच्या मनात घोळू लागले; पण एकदम तसं करणं बरं दिसलं नसतं. म्हणून तो एकदम कडाडला—

"कर्नाटकी, हा पृथ्वीराज आहे का ते सांग मला." कर्नाटकी कावरीबावरी झाली. पण चांदभाटानं तिला इशारत केली. तेव्हा ती सावधपणं म्हणाली "महाराज, मी पृथ्वीराजांना ओळखते. हा आपला कयास बरोबर आहे; पण आणखी एक गोष्ट सांगते. पृथ्वी-राजना पाहिलं की नेहमी मी डोक्यावरनं पदर घेते." असं बोलून ती पृथ्वीराजाजवळ गेली मात्र. तिनं पदर डोक्यावर घेतला. सगळ्या दरबारच्या नजरा तिच्याकडं रोखताहेत तोच तिनं पदर खाली टाकला. तेव्हा जयचंद ओरडलाच—

"याचा अर्थ काय कर्नाटकी."

"महाराज मी जवळ गेले तेव्हा मला पृथ्वीराजचा भास झाला म्हणून मी पदर डोक्यावर घेतला. पण तो भासच आहे ही गोष्ट ध्यानात आल्यावर पदर खाली टाकण्याखेरीज मला गत्यंतर नव्हतं." कर्नाटकीच्या या खुलाशानं जयचंदाची पृथ्वीराजला कैद करण्याची आशा पार मावळली.

* *

हा सर्व प्रकार चालू असताना चांदभाटाच्या इशाऱ्यासरशी पृथ्वीराजनं संयोगितेला उचललं अन् तीरासारखा तो बाहेर आला नि घोड्यावर बसून दिल्लीकडं निघाला. चांदभाटानंही त्या गडबडीत तिथून नंतर पाय काढला. जयचंदालाही त्याची सारी चलाखी

अनुक्रमणिका

समजली पण वेळ निघून गेली होती; कारण पृथ्वीराजनं संयोगितेला केव्हाच नेलं होतं.

संयोगितेच्या सहवासात पृथ्वीराज आता पुरा रमला होता. ती शृंगारनिपुण असल्यानं त्याचं विषयासक्त मन राज्यकारभारात मुळी लागेनाच. चांदभाटाशिवाय मात्र त्याचं पान हलत नसे. हीच गोष्ट संयोगितेला सलू लागली. एकदा दोघं महालात बसली असताना पृथ्वीराजानं तिला विचारलं –

"तू आज उदास कां?"

"खरं सांगू?"

"सांग."

"आपण सदान्‌कदा राज्यकारभारात गर्क असता. तशात लढायातही आपला बराच वेळ जातो. चांदभाटांशिवाय तर आपल्याला मुळीच करमत नाही. माझ्या वाट्याला आपण फक्त रात्री काय ते येता? त्यामुळं मी फार कंटाळलेय!" "मग मी काय करावं असं तुझं म्हणणं आहे?" "लढाया आता पुरे. चांदभाटांशीही संबंध फार नका ठेवू. किती झाला तरी तो आपला सेवकच. त्यानं आपली पायरी ओळखून असावं हे बरं नाही का?"

"कर्नाटकी असते ना तुझ्या दिमतीला दिवसभर." "मी काही तिच्याशी पूर्वीसारखी सलगी नाही ठेवलेली आता. आता किती झालं तरी मी राणी आहे. पूर्वीची गोष्ट निराळी होती."

"बरं राहिलं. आता सारा वेळ तुझ्या संगतीत काढीन. मग तर झालं. राजानं कुणाच्या मुठीत राहू नये पण

"पण बायकोच्या मुठीत रहावं" संयोगितेनं त्याचं वाक्य पुरं केलं. तेव्हा तो खळखळून हसला.

पृथ्वीराज पराक्रमी असला तरी त्याचा सारा उत्कर्ष चांदभाटाच्या साहाय्यामुळंच झाला; पण सुन्दर बायकोच्या सहवासात या गोष्टीचा त्याला विसर पडत चालला. त्याच्या विषयलोलुपतेची तिला पुरी कल्पना असल्यानं तिनं त्याला आपल्या भजनी लावलं. तिनं त्याला पुरं शरविद्ध केलं. "संयोगिता, एक विचारू?" पृथ्वीराज बोलला.

"विचारा."

"रागावणार नाहीस?"

"नाही."

"मी शराब घेऊ?"

त्याच्या या प्रश्नानं ती चमकली. पण दारूच्या नादात याला आपल्या मुठीत कायमचा ठेवता येईल असा विचारही तिच्या डोक्यात चमकून गेला अन् मग ती बोलली –

"घ्या. पण थोडी घेत चला" तेव्हा त्यानं तिचा लुसलुशीत हात हातात घेतला अन् तो म्हणाला – "तुला काय हवंय?"

"आपण सदा माझ्या सन्निध असावेसं मला वाटतं" मग त्यानं तिला बाहुपाशात ओढलं. तिच्यावर तो पुरा नादावला. त्याच्या विषयलोलुपतेला धरबंद उरला नाही. तिलाही शृंगाराची हौस होती अन् पृथ्वीराज मुळातच पडला रंगेल गडी. त्याचा सारा काळ तिच्या महालातच जाऊ लागला. दरबारची कामं अडून राहू लागली. चांदभाटाच्या भेटीलाही संयोगितेनं मज्जाव केला. महिनेन् महिने दोघा मित्रांची गाठ पडेनाशी झाली.

पृथ्वीराजाचा विनाशकाल जवळ आल्याची स्वच्छ कल्पना चांदभाटाला आल्याखेरीज राहिली नाही. दरबाराला त्यानं रामराम ठोकला अन् तो देवीच्या देवळात जाऊन तिच्या आराधनेत काळ कंठू लागला.

एके दिवशी हेरांनी पृथ्वीराजाला शत्रू दाराशी आल्याची बातमी दिली.

"कोण आलाय माझ्यावर स्वारी करून?" "गज्नीचा शहाबुद्दीन घोरी" हेरांनी सांगितलं. "मी त्याला दोनदा जिवंत सोडलंय. तरी उलटला सर्पासारखा. आता त्याचा समूळ नाश करण्याची सेनापतीला आज्ञा द्या" "आपला हुकूम सेनापतींना सांगतो" हेर बोलले.

पृथ्वीराज संयोगितेचा सहवास काही केल्या सोडीना. सरदार-सेनापती त्याला भेटावयास येत पण संयोगिता त्यांची त्याच्याशी भेट घडवून देईना. कर्नाटकीनं एकदा त्याची कानउघाडणी केली. संयोगिता जवळ नाही असं पाहून ती बोलली – "महाराज सारा घात झालाय, शहाबुद्दीन दिल्लीचे दरवाजे ठोठावतोय. आपण युद्धावर गेल्याशिवाय फौजेला स्फुरण कसं येणार? त्याच्या नरडीचा घोट घेण्यासाठी आता महालातून लौकर बाहेर पडा."





अनुक्रमणिका

पृथ्वीराज तलवार घेऊन समरांगणावर निघाला तरी त्याचं मन अन् शरीर अतिरिक्त विषयसेवनामुळं साफ पोखरून गेलं होतं. मनानं तो पुरा नि:सत्व वनला होता. निघताना तो संयोगितेला म्हणाला–"तुझं सौभाग्य राखण्यासाठी मला आता गेलं पाहिजे. जगलो वाचलो तर परतेन."

"आपल्यासारख्या पराक्रमी पुरुषानं अशी निराशेची भाषा कां काढावी ?"

"संयोगिता, चांदभाटाचा पत्ता नाही. तू माझी त्याच्याशी ताटातूट केलीस. तो माझं सर्वस्व होता. त्याच्या साहाय्याखेरीज माझी फत्ते होणार नाही. तुझं सौभाग्य शाबूत रहावं असं तुला वाटत असेल तर त्याला शोधून काढ. त्याची क्षमा माग अन् समरांगणावर त्याला माझ्याकडं धाड."

पण काळ आता पृथ्वीराजाला अनुकूल राहिला नव्हता. त्याचे मोठाले सरदार रणात कामी आले. चांदभाटाला याचा पत्ता नव्हता. तो न भेटल्यामुळं पृथ्वीराजचा धीर खचला अन् मग तो शहाबुद्दीनच्या हातात सापडला. तो फार क्रूर होता. पृथ्वीराजानं त्याला दोनदा जीवदान दिलं त्याची याद तो विसरून गेला. त्यानं पृथ्वीराजचे डोळे काढले. त्याची धिंड काढून एखाद्या कैद्याप्रमाणं त्याला गज्नीला फरफटत तो घेऊन गेला. डोळे गेल्यावर पृथ्वीराजचे अंत:चक्षू उघडले पण आता काही उपाय राहिला नव्हता.

संयोगितेला बऱ्याच प्रयासानं यश लाभलं. कारण देवळात चांदभाट तिच्या दृष्टीस पडला. ती त्याच्या अक्षरश: पाया पडली. "कां आलीस संयोगिता ?" चांदभाटानं उत्सुकतेनं प्रश्न केला.

"चांदभाट, सगळा घात झाला. आता माझं सौभाग्य आपल्याच हाती आहे. दिल्लीपतींना शहाबुद्दीननं पकडून नेलं. त्यांचे डोळे काढल्याची बातमी आहे" "देवी, फार उशीर झाला आता. तुझे डोळे फार उशीरा उघडले. शहाबुद्दीन म्हणजे नुसता काळसर्प आहे तो पृथ्वीराजचा प्राण घेतल्याशिवाय रहाणार नाही. मी आता गज्नीला जातो. पृथ्वीराजकरिता काय करता येईल ते जरूर करीन. आलो तर दोघे येऊ. नाहीतर माझी आपली ही शेवटची भेट समजा. कारण पृथ्वीराजशिवाय मी जगू शकणार नाही. मात्र शहाबुद्दीनचा सूड घेतल्याशिवाय आम्ही इहलोक सोडणार नाही एवढंच मी आपल्याला सांगतो" संयोगिता सुन्न मनानं त्याचं बोलणं ऐकत होती.

* *

मजल दरमजल करीत चांदभाट गज्नीला शहाबुद्दीनकडं आला. दरम्यान त्यानं पृथ्वीराजची सगळी खबर मिळविली. दरबारात चांदभाटची गाठ पडल्यावर शहाबुद्दीन बोलला–

"चांदभाट, आपल्या दर्शनानं मला आनंद होतोय. आपल्या काव्यशक्तीबद्दल मला आदर आहे. मी आपल्यासाठी काय करू ?

"एक गोष्ट कराल ?"

"अवश्य करीन."

"आमचा राजा फार खंगत चाललाय. आपण त्याचे डोळेही काढलेत. एकवार त्याची भेट घडावी अशी इच्छा आहे."

"आपली इच्छा जरूर पुरी केली जाईल."

कारावासात साखळदंडाच्या विळख्यात पृथ्वीराजला पाहिल्यावर चांदभाटाचे डोळे पाणावले. पृथ्वीराज तर तो आला आहे असं समजल्यावर ढसढसा रडू लागला. कारण डोळे गेल्यानं त्याच्या दर्शनाला तो कायमचा पारखा झाला होता. दु:ख आवरून चांदभाट पृथ्वीराजला बोलला–"मित्रा, काळ तर मोठा कठीण आलाय. संयोगिता तुझ्याकडं डोळे लावून वसलीय." प्रथमच तो पृथ्वीराजला एकेरी नावानं हाक मारीत होता.

"चांदभाट, डोळे गेले. आता संयोगितेकडं जाऊन उपयोग काय ?"

"आता तुझे डोळे उघडले आहेत. तिच्याकडं आता तू अंत:-चक्षूंनी पहा. मला फार वेळ इथं थांबण्याची परवानगी नाही. तुझी सुटका करण्याचा प्रयत्न मी करून पहातो. जगलो वाचलो तर दोघंही दिल्ली गाठू. नाहीतर दोघंही देवाकडं जाऊ. तुझ्याशिवाय मी जगणार नाही एकटा. पण देवाकडं जाण्यापूर्वी शहाबुद्दीनचा सूड घेण्याची संधी मी तुला हर प्रयत्नानं देईन. त्यावेळी सावध ऐस अन् त्याक्षणी त्याला अल्लाकडं धाडण्यास विसरू नकोस, मी जातो आता. माझी वेळ संपलीय."

"काय, भेट झाली पृथ्वीराजची ?" शहाबुद्दीन दरबारात चांदभाटला विचारीत होता.

"झाली. पण एक गोष्ट खटकली."

"बोला."

"आमच्या राजानं आपल्याला दोनदा जीवदान दिलंय. पण ते आपण साफ विसरलात. डोळे तर काढलेतच त्याचे पण वर हालही त्याचे चालू आहेत. उपासमारीनं तो पार खंगलाय. त्याच्या जेवण्याखाण्याची चांगली सोय करा अन् त्याला राजाप्रमाणं वागवा."

"आपल्या स्पष्टोक्तीवर मी बेहद्द खूप आहे. पृथ्वीराजाची बडदास्त यापुढं आम्ही चांगली ठेवू."

"आणखी एक गोष्ट पेश करायचीय." "पृथ्वीराजचे प्राण सोडून दुसरं काही मागा." "त्याला आपण जिवंत सोडणार नाही याची खात्री मला आहे. आपलं अंत:करण फत्तराचं आहे म्हणून तर त्याचे डोळे गमावले. पण आमचा राजा मोठा गुणी आहे. त्याच्या धनुर्विद्येचे खेळ आपण एकवार पहावेत अशी विनंती आहे."

"आम्ही ते खेळ जरूर पाहू."

"शंभर मणांचे सात तवे एकापुढं एक टांगलेत तर नुसत्या शब्दाच्या रोखानं अचूक वेध करून तो ते फोडून टाकील."

"काही तरी सांगताय झालं. आंधळा हा चमत्कार कसा करणार ?"

"म्हणून तर म्हणतोय त्यांच्या हातून हा चमत्कार पहा म्हणून."

"उद्या दरबारात हा खेळ आम्ही जरूर पाहू."

शहाबुद्दीनच्या दरबारात उभं रहाण्यास जागा नव्हती. पृथ्वीराजला तिथं आणण्यात आलं. त्याच्या भोवती सैनिकांचा पहारा होता तरी त्याचे हात मोकळे करण्यात आले. त्याला निरनिराळी धनुष्यं देण्यात आली. पण त्यानं सगळ्यांची केव्हाच वाट लावली.

अनुक्रमणिका








मग त्याचं जिंकून आणलेलं धनुष्य त्याला देण्यात आलं. तेव्हा त्याला कृतकृत्य वाटलं. आपल्या आयुष्यातला अखेरचा क्षण आल्याची चाहूल त्याला आली. 'सूड घे' हे चांदभाटाचे शब्द त्याच्या डोक्यात घोळत होते.

दरबारात सात तवे टांगण्यात आले. चांदभाट शहाबुद्दीनला म्हणाला—"आपण एकेका तव्यावर खडा मारून आवाज करा. मग पहा आमचा राजा शरसंधान कसं करतो ते. त्याचं शरसंधान झाल्या-वर आपण फक्त 'शाब्बास' म्हणा म्हणजे त्याला स्फुरण चढून तो सातही तवे आपल्या शरसंधानानं फोडून टाकील" शहाबुद्दीननं त्याला होकार दिला.

चांदभाट पृथ्वीराजाजवळ येऊन आपल्या भाषेत बोलला—"राजा सावध हो. तुझा शत्रू शहाबुद्दीन तुझ्यासमोर बसलाय. त्याच्या तोंडून 'शाब्बास' असा उद्गार निघाला की तू अचूक बाण मारून त्याचा निकाल लाव. सूड घेण्याची ही संधी दवडू नकोस. नेम बरोबर मार. एवढं केलंस तर तुझी कीर्ती अक्षय राहील."

पृथ्वीराजला सगळी कल्पना आली. शहाबुद्दीनच्या सेवकानं तव्यावर खडा मारल्यावर आवाजाच्या रोखानं त्यानं बाण सोडला. तो बाण तव्याच्या आरपार गेला. तव्याचे दोन तुकडे झाले. त्या आवेगात 'शाब्बास' असे शब्द शहाबुद्दीनच्या मुखातून बाहेर पडले.

तो शब्दवेध पृथ्वीराजानं अचूक टिपला अन् डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोच बाणानं शहाबुद्दीनचं मस्तक त्यानं धडावेगळं केलं.

तेवढ्यात चांदभाट पृथ्वीराजाशी गेला. अन् बोलला. "मित्रा, धन्य आहे तुझी. शत्रूचा तू सूड उगवलास. आता आपल्या दोघांना मरण आलं तरी बेहत्तर." या अघोरी प्रकारामुळं सैनिक दोघांवर तुटून पडणार तोच चांदभाट अन् पृथ्वीराज या दोघांनी आपली शिरे धडावेगळी केली. सैनिकांच्या तलवारीला बळी पडण्यापूर्वी दोघांनी आत्मघात पत्करला.

चांदभाटाचा सेवक संयोगितेच्या महालात उभा होता. त्याला पाहिल्यावर ती बोलली — "एकटाच कसा रे ?"

तो बोलणार काय ? त्याच्या तोंडून शब्द निघेना. त्यानं मान खाली घातली. अन् हळू आवाजात तो बोलला—

"देवी, माझा धनी आपल्याला चुडेदान देऊ शकला नाही. पण राजांनी शत्रूचा सूड घेतला. नंतर दोघेही मित्र एकसाथ देवाकडं गेले"

सेवकाच्या शब्दांनी संयोगिता धाडकन् धरणीवर कोसळली. तिच्या बांगड्यांचा चक्काचूर होऊन त्याचे तुकडे सर्वत्र पसरले होते अन् चांदभाटाचा सेवक ते दृश्य मुक्या मनानं पहात होता.

• • •



# महात्मा गांधींच्या सान्निध्यात

१९२० च्या डिसेंबर महिन्यात महात्मा गांधी अगदी पहिल्या प्रथमच बेळगावास आले होते. त्यांच्या स्वागताकरिता बेळगावच्या किल्ल्यालगतच्या प्रशस्त मैदानात रात्री ९ वाजता प्रचंड जाहीर सभा कर्नाटक सिंह कै. गंगाधरराव देशपांडे यांनी आयोजित केली होती. मी त्या सभेत स्वयंसेवक म्हणून काम करीत होतो. महात्मा गांधीजींचे स्वागतास व त्यांचे भाषण ऐकण्यास त्या सभेत १ लाखाचा प्रचंड जनसमुदाय उपस्थित होता. महात्मा गांधीजींचा त्यावेळचा वेष म्हणजे धोतर, खादीचा अंगरखा व डोकीस गांधी टोपी असा अगदी साधा होता. महात्मा गांधींबरोबर मौलाना शौकत अल्लीही होते. महात्मा गांधींनी त्या सभेत स्वदेशी कपडे वापरणे, परदेशी कापड व वस्तूवर बहिष्कार घालणे व सूत कातणे या विषयांवर भाषण केले. महात्मा गांधी हिंदी भाषेत बोलत होते व त्याचे कानडीत भाषांतर गंगाधरराव देशपांडे करीत होते. कारण सभेत बहुसंख्य श्रोते कानडी बोलणारे होते. महात्माजींच्या भाषणानंतर मौलाना शौकत अल्लींचेही भाषण १५-२० मिनिटे उर्दूत झाले. मी त्या वेळी बेळगाव नजिकच्या शहापूर येथील श्री. चिंतामणराव हायस्कूलमध्ये इंग्रजी तिसरीत शिकत होतो.

महात्मा गांधीजींना त्या वेळी बेळगाव शहरापासून २॥ मैल अंतरावरील ठळकवाडी येथील श्री. शालगार यांच्या प्रशस्त बंगल्यात उतरविण्यात आले होते. मी बेळगावात रहात होतो. वरील सभेनंतर दुसऱ्या दिवशी मी व आमचे शेजारचे आप्त श्री. श्रीपादराव कित्तूर असे दोघे भल्या पहाटे उठून पायी चालत सूर्योदयाच्या आत ठळकवाडीस श्री. शालगारांच्या बंगल्यापाशी महात्माजींचे दर्शन घ्यावे म्हणून हजर झालो. आमच्या आधीच शेकडो लोकांनी महात्माजींच्या दर्शना करता शालगारांच्या बंगल्यासमोर रांगा लावल्या होत्या. सुमारे २ तास रांगेत उभे राहिल्यानंतर आमचा नंबर लागला. स्वयंसेवकाने आम्हास माडीवर महात्माजींच्या दर्शनास नेले. महात्माजी आंघोळ करून अंगावर स्वत: कातलेल्या सुताच्या खादीच्या शुभ्र वस्त्रासह सुहास्य मुद्रेने गालिच्यावर बसलेले होते.

महात्मा गांधीजीना यानंतर अगदी जवळून पहाण्याचा व त्यांचे थोर व्यक्तिमत्व न्याहाळण्याचा योग पुन: ४ वर्षांनी आला. १९२४ साली अखिल भारतीय काँग्रेसचे ३६ वे वार्षिक अधिवेशन बेळगावला ३ दिवस भरले होते. महात्मा गांधी या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. बेळगावनजिकच्या ठळकवाडी येथे व्हॅक्सीन डेपोजवळ प्रशस्त मैदानात काँग्रेसचा भव्य मंडप होता. कर्नाटकच्या विजयनगर साम्राज्याची उज्ज्वल स्मृति म्हणून काँग्रेस मंडपाचे प्रवेशद्वार गतकालीन वैभवाची आठवण म्हणून अत्यंत सुशोभित व नेत्रदीपक असे उभारण्यात आले होते. मी त्यावेळी ठळकवाडी येथील श्री टिळक राष्ट्रीय विद्यालयात प्रवेश परीक्षा–मॅट्रीक वर्गात–शिकत होतो. या काँग्रेस अधिवेशनात मी स्वयंसेवक म्हणून कै. गु. श्रीपाद गुरुनाथ कित्तूर यांचे अधिपत्याखाली स्पिनिंग हॉलमध्ये कामास होतो. एका प्रशस्त तट्टयाच्या मंडपात बेळगाव शहरात घरोघरी हिंडून गोळा केलेले सूत कातण्याचे ५०० चरखे मांडण्यात आले होते. या चरख्यावर सूत काढण्यास काँग्रेस अधिवेशनाकरता आलेले भारतातील निष्ठावंत काँग्रेस पुढारी व प्रतिनिधी दररोज नियमितपणे ३ दिवस येत होते. या काँग्रेस प्रतिनिधींना सूत काढणेस चरखा तेल वगैरे घालून व्यवस्थित करून देणे, पेळू पुरविणे, त्यांनी कातलेले सूत मोजून

व त्यावर त्यांचे नांवाचे लेबल चिकटविणे, व रजिस्टरला त्यांचे नांव दाखल करणे ही कामे आम्हा येथे काम करणाऱ्या १२ स्वयंसेवकांना करावी लागत. या आमच्या स्पिनिंग हॉलमध्ये देशबंधु दास, मौलाना शौकत अल्ली, सुभाषचंद्र बोस, लाला लजपत रॉय वगैरे श्रेष्ठ पुढारी व महाराष्ट्रातील शंकरराव देव, वाळू काका कानिटकर, दास्ताने, काकासाहेब खाडिलकर, न. वि. गाडगीळ, जेधे, मोरे वगैरे थोर पुढारी व कर्नाटकातील गंगाधरराव देशपांडे, बाबासाहेब सोमण, हर्डीकर, रंगराव दिवाकर, कौजलगी वगैरे थोर थोर मंडळी ३ दिवस सूत कातून गेली. कॉंग्रेस अधिवेशनाच्या शेवटच्या दिवशी खुद्द महात्मा गांधीजीही आमच्या खास निमंत्रणावरून आमच्या स्पिनिंग हॉलमध्ये आले व त्यांनी सुमारे अर्धा तास बसून स्वतः सूत कातले. महात्माजीनी स्पिनिंग हॉलमध्ये आम्ही ठेवलेली व्यवस्था पाहून आम्हास शाबासकी दिली. महात्मा गांधीनी कातलेले हे सूत कै. गु. कित्तूरनी रौप्यकरंडकात घालून ते आपल्या देव्हाऱ्यात ठेवले व महात्माजींच्या स्मृतीस चालना दिली. महात्मा गांधींबरोबर स्वागताध्यक्ष गंगाधरराव देशपांडे, शंकरराव देव, कौजलगी व मौलाना शौकत अल्ली व इतर कॉंग्रेस प्रतिनिधी असा जवळ जवळ ४०० मंडळींचा समुदाय आमच्या स्पिनिंग हॉलमध्ये उपस्थित होता व त्या सर्वांनी महात्माजींबरोबर सामुदाईकरीत्या त्या वेळी सूतकताई केली.

या कॉंग्रेस अधिवेशनास महात्मा गांधीजी खादीचा लांडा पंचा व अंगावर खादीचेच स्वतः कातलेल्या सुताचे उपरणे केवळ एव्हढ्याच वस्त्रांवर उपस्थित होते व हाच वेष त्यांच्या जीविताच्या अखेरपर्यंत कायम होता. यावरून या बॅरीस्टर झालेल्या थोर महात्म्याची उज्ज्वल त्यागी वृत्ती जगाच्या नजरेस येऊन त्यांची जगभर वाहवा झाली.

**भर पावसातही कार्यक्रम**

यानंतर महात्मा गांधींना समक्षात पहाण्याचा व त्यांचे जाहीर भाषण श्रवण करण्याचा योग १२ वर्षांनी म्हणजे १९३७ साली आला. मी त्यावेळी सांगली नगरपालिकेच्या धर्मार्थ आयुर्वेदिक दवाखान्यात मेडिकल ऑफीसर म्हणून काम पहात होतो. कर्नाटक सिंह कै.गंगाधरराव देशपांडे यांनी आपल्या बेळगाव जिल्ह्यातील हुदली या लहानशा खेड्यात गांधी सेवासंघाच्या वतीने तारीख १६-४-१९३७ ला संघाचे अधिवेशन ३ दिवस भरविले होते. या अधिवेशनास महात्मा गांधीना कै. गंगाधरराव देशपांडे यांनी खटपट करून व खूप आग्रह करून आणले होते. या अधिवेशनाचे वैशिष्ट्य म्हणजे हुदली गावापासून लांब १ मैलावर ते गंगाधररावांच्या मालकीच्या शेतात उघड्यावर भरले होते. प्रतिनिधींच्या व खुद्द महात्माजींच्या निवासासाठी कडब्याच्याच झोपड्या उभारण्यात आलेल्या होत्या. प्यावयास गाईचे निर्भेळ दूध, गाईच्या दुधाचे दही, ताक, लोणी, तूप व असडिक तांदुळाचा भात असा

## डॉ. दामोदर द. जोशी

भोजनाचा थाट होता. या अधिवेशनाच्या जागेस गांधीग्राम असे नांव ठेवण्यात आले होते. या अधिवेशनाचे आणखीन् एक वैशिष्ट्य म्हणजे उन्हाळ्यातील एप्रिल महिन्याचे दिवस असूनसुद्धा अधिवेशनाच्या दुसऱ्या दिवशी दुपारी आभाळात एकाएकी ढग जमून मुसळधार पाऊस कोसळू लागला. जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन प्रतिनिधींच्या झोपड्यातून गुडघाभर पाणी साचले. सर्व कार्यक्रमात अशा या निसर्गकोपाने व्यत्यय आला. परंतु महात्मा गांधी मुळीच डगमगले नाहीत. हुदलीजवळील कुमरी आश्रम पहाण्यास महात्मा गांधी अधिवेशनाच्या वेळी दुसऱ्या दिवशी गेले होते. हुदली गावाहून कुमरी आश्रम २ मैल लांब आहे. पाऊस एकसारखा धो-धो पडत होता. तो थांबण्याचे चिन्ह दिसेना. कुमरी आश्रमातही पाणी शिरले होते. शेवटी त्या तशा मुसळधार पावसातच महात्माजी भिजत हुदली गावात २ मैल चालत गेले. महात्माजींच्या समवेत गंगाधरराव देशपांडे यांचे निष्ठावंत शिष्य पुंडलीकजी कातगडे छत्री घेऊन चालत होते. पण पावसाचे जोरापुढे छत्रीचा टिकाव लागला नाही. दोघेही भिजून ओलेचिंब झाले. या अधिवेशनाच्या वेळी ग्रामीण भागातील उद्योगधंद्यांचे व शेतकामास उपयोगी पडणाऱ्या अवजारांचे छोटेखानी प्रदर्शनही गंगाधररावांच्या विशेष खटपटीने भरले होते. पण पावसामुळे प्रदर्शनातील मालाचेही फार नुकसान झाले. मी या अधिवेशनास उपस्थित राहण्याकरिता मुद्दाम सांगलीहून रजा घेऊन गेलो होतो. या पावसामुळे गांधी सेवासंघाच्या सदस्यांचा व तेथील कार्यकर्त्यांचा बराच विरस झाला. पण महात्माजीनी पावसास न जुमानता ठरलेला कार्यक्रम ठराविक वेळेत पार पाडण्याचा जिद्दीचा प्रयत्न केला व तसा तो ठरल्याप्रमाणे अत्यंत यशस्वीपणे पार पडलाही.

अधिवेशनाच्या शेवटच्या दिवशी महात्मा गांधीजींचे जाहीर भाषण आयोजित केले होते. मुंबई, पुणे, सातारा, मिरज व हुबळी, धारवाड वगैरे लांबलांबचे लोकही त्या साधूमूर्तीस पहाण्यास व त्यांचे बहुमोल भाषण श्रवण करण्यास हुदलीनजिकच्या शेतात जमले होते. सभेस ७५ हजार लोकांचा प्रचंड जनसमुदाय उपस्थित होता. एका प्रचंड आम्रवृक्षाखाली शेतात एका टेबलावर महात्माजींची उघडीबोडकी कृशमूर्ती लांडा पंचा नेसून व डोळ्यास चष्मा लावून बसली होती. समोर अथांग जनसागर मंत्रमुग्ध होऊन शेतातल्या मातीवरच

(पृष्ठ ६४ वर)

> ......समारंभस्थानी जात असतानाच अकस्मात बॉंब-स्फोट झाला व त्याचे तुकडे गांधीजींना चाटून गेले...पण तो महात्मा मुळीच डगमगला नाही. जणू काहीच झाले नाही असे मानून त्यांनी पुढील कामाला प्रारंभ केला..



रजतमहोत्सवी
वर्षानिमित्त
खास लेख

:३:

# दीपावलीतील सांस्कृतिक साहित्य

—आनंद साधले

'दीपावली'च्या रौप्यमहोत्सवी लेखमालेसाठी 'दीपावलीतील सांस्कृतिक साहित्य' या विषयाचा आढावा मी घ्यावा असा आदेश संपादकांकडून आला तेव्हा मी दुहेरी अडचणीत असल्याची मला जाणीव झाली. एक अडचण म्हणजे मला या नांवात थोडा अव्याप्तीचा भास झाला. कोणतीही साहित्यिक हालचाल हीच मुळी सांस्कृतिक हालचाल असते. त्यातूनही 'साहित्य आणि कला यांचा संगम' असे विरुद्ध यथार्थपणे मिरविणारे दीपावली मासिक तर सर्वांगाने सांस्कृतिक होय. तेव्हा या सांस्कृतिक मासिकातील सांस्कृतिक साहित्याचा विचार करावयाचा म्हणजे ते काम सुगंधी अत्तराचा पुन्हा अर्क काढण्यासारखे आहे.

अव्याप्तीसारखा थोडा अतिव्याप्तीचाही वास इथे आहे. 'दीपावली'त संगीतावरील रसाळ लेख आहेत; नाट्यविषयक लेख आहेत; क्रीडाविषयक लेख आहेत. संस्कृतीचा संकोच करावयाचा म्हटला तरी ही सारी अंगे ठळक सांस्कृतिक अंगेच होत. पण त्यांचा विचार संपादकांनी या लेखाच्या कक्षेत सामावलेला नाही. सांस्कृतिक शब्दाचे संस्कृत (भाषा) शब्दाशी काही नाते आहे. या नात्याने सिद्ध होणाऱ्या 'सांस्कृतिक' शब्दाचा आता अर्थविस्तार झालेला आहे. माझ्या आढाव्याच्या बाबतीत हा विस्तार अंतर्भूत नाही. संस्कृत साहित्याशी संबंधित लेख प्रामुख्याने आणि प्राकृत साहित्य, लोककथा, लोकगीते इत्यादी संबंधीचे लेख अनुषंगाने, या माझ्या ढोबळ मर्यादा आहेत.









अनुक्रमणिका

## रसघन साहित्य सतत पंचवीस वर्षे पुरविणे ही गोष्ट उपऱ्या उपचाराची नाही .... सुजाण निष्ठा नि जागरूक प्रयत्न यांची ती साधना ....

'दीपावली'चे प्रकाशन हा धंदा नाही. ती एक अत्यंत तरल, अत्यंत कलालुब्ध आणि सुसंस्कृत अशा मनाची हौस आहे. हौसेने केलेली गोष्ट नेटकी व्हावी हे साहजिक होय. आज 'दीपावली'ला जी अग्र प्रतिष्ठा संपादनातील नेटकेपणामुळे लाभली आहे तो नेटकेपणा म्हणजे अपघात नसून एक डोळस निष्ठा आहे. 'दीपावली'च्या अगदी पहिल्या अंकापासून जुने साहित्य आणि संस्कृती यांची प्रतिष्ठा राखलेली दिसून येते. 'दीपावली'च्या यशाकडे हिरव्या डोळ्यांनी पाहिले गेले तेव्हा इतर बाबती-प्रमाणे याही बाबतीत अनुकरणाचे प्रयत्न झाले. पण त्या उपऱ्या अनुकरणाची केव्हाच वावडी झालेली असून आंतरिक निष्ठेचे मूळबीज तेवढे पारिजातकाच्या वृक्षासारखे बहरले आहे. शृंगारासाठी म्हणून संस्कृत साहित्याकडे उसळी घेणाऱ्यांचा उफाळा जिरलेला आहे. आंतरिक जिव्हाळ्याने त्या साहित्याकडे पहाणाऱ्यांसाठी ते साहित्य नवरसांची उपायने भरभरून उधळीत आहे. उपऱ्या प्रीतीला वारांगनेच्या नखऱ्याप्रमाणे क्षणाचा प्रतिसाद मिळावा आणि निष्ठावान प्रीतीचा संसार कुलांगनेच्या विभ्रमांनी बहरास यावा हा सृष्टीचा नियमच आहे.

संस्कृत साहित्याची प्रतिष्ठा 'दीपावली'त ज्या गौरवाने राखलेली आहे त्या गौरवाचे स्वरूप आलेल्या पाहुण्याला 'या बसा' म्हणण्यासारखे औपचारिक नसून सन्मानाने आमंत्रिलेल्या मान्यवर प्रियजनांच्या स्वागतासारखे हार्दिक आहे. सतत पंचवीस वर्षे अशा दर्जाचे रसघन साहित्य मिळवून पुरविणे ही गोष्ट उपऱ्या उपचाराची नव्हे. सुजाण निष्ठा आणि जागरूक प्रयत्न यांची ती साधना आहे. साऱ्या संस्कृतप्रेमी विश्वाने 'दीपावली'चे उपकृत रहावे इतकी ती साधना तोलामोलाची आहे.

'दीपावली'तील मनोज्ञ चित्रांवर पूर्वीच लेख येऊन गेलेला आहे. चित्रात कला म्हणून मला गती नाही आणि त्यांच्यावर त्या दृष्टीने लिहिण्याचा मला अधिकार नाही. पण आज सतत पंचवीस वर्षे श्री. दलाल जे चित्रविषय निवडीत आहेत ते सारे या लेखातील संस्कृतीच्या माहेरचेच आहेत. त्यामुळे त्या चित्रांना ओलांडून या लेखात पुढे जाता येणार नाही. अष्टनायिका, नऊरस, सहा ऋतू, सहातीर्थे, षड्विकार, संगीतराग असे एकाहून एक आशयघन आणि रूपघन विषय 'दीपावली'चे संपादक सतत पंचवीस वर्षे पुरवीत आहेत. तरल रसिकतेच्या सुसंस्कृत वाचकाने वर्षानुवर्षे संस्कृत साहित्याचे अध्ययन केल्यास अनेक संकेतामागील जे सौंदर्य त्याला पुसटसे जाणवणे शक्य आहे ते दलालांच्या जादूगार कुंचल्याने एकेका चित्रात समूर्त केले आहे. त्यांचे कुठलेही एक चित्र पाहिले की एक अभिजात साहित्यकृती वाचल्याने वाटणारा आनंद जाणवतो. दलालांची ऋतुचित्रे पाहून कालीदासाचा ऋतुसंहार वाचल्याची तृप्ती मिळते. कालीदासाच्या मेघदूतातील रससौंदर्याचा सारा आशय दलालांनी चित्रांकित केलेल्या मेघदूतात मूर्त होतो, आणि त्याच्या कुमारसंभवातील हिमालयाचे सारे उदात्त-गंभीर निसर्गसौंदर्य आणि उमाशंकराच्या प्रीतीचे रससौंदर्य दलालांच्या 'राग भैरव'-सारख्या चित्रात डोळ्यापुढे उभे रहाते. सिंधू नदीचा अवखळपणा, गोदावरीची तीर्थवत्ता, गंगेची शुचिता, कालिंदीची प्रीती यांचे दलालांच्या चित्रातून जे लोभस दर्शन होते ते त्या त्या नद्यांची यात्रा करूनही होणे शक्य नाही. अगदी पंचवीस वर्षे सतत चाललेल्या या ओघाची गंगोत्री पहिल्या अंकातही दिसते. पहिल्या अंकातील 'आसावरी' हे चित्र अथवा दुसऱ्या अंकातील मुग्धेचे चित्र ही पाहिली की आपणास काय करावयाचे आहे याची रेखीव कल्पना या जादूगार कलाकराकडे पंचवीस वर्षापूर्वी होती हे जाणवते आणि चित्त आदराने भारावते. मयसभेसारख्या रूपवान अशा या सृष्टीच्या साऱ्या निर्माणाचा भार बऱ्हंशी एकटचा दलालांच्या करांगुलीने वाहिलेला आहे. दलालांचे अनेक दिवसांचे साहाय्यक श्री. परब आणि त्यांच्या जीवनसहचारिणी सौ. सुमति दलाल यांनीही या गोवर्धनाच्या उद्धारात आपले सहकार्य दिलेले आहे.

### सांस्कृतिक साहित्याची मुहूर्तमेढ

चित्रानंतर सांस्कृतिक साहित्याच्या दालनात प्रवेश केल्याबरोबर पहिली मानाची आदरांजली अर्पण करावयास हवी ती कै. स. आ. जोगळेकर यांच्या चरणाशी. हालाच्या गाथासप्तशतीचा परिचय पहिल्याच अंकात रसाळपणे करून देऊन जोगळेकरांनी 'दीपावली'तील सांस्कृतिक साहित्याची मुहूर्तमेढ लावली. या लेखात मराठी लोकांना अभिमानास्पद अशा या ग्रंथातील सौंदर्य प्रकट केलेले आहे. लब्धप्रतिष्ठित टीकाकार आणि प्रतिगामी वाचक यांनी ग्रंथावर केलेल्या वृथा आरोपांचे खंडन केले आहे आणि अनेक गाथांचा रसाळ परिचय करून दिलेला आहे. (१९४५). जिच्या प्रीतीचा स्पर्श थंडीमधे सुखोष्ण आणि उन्हाळ्यामधे सुखशीतल असतो अशी सदा-सुखद श्यामला स्त्री हे संस्कृतमधील एक संकेतस्वप्न आहे. इंद्रपदाचे वैभव आणि अशी स्त्री ही एकच होत. सामान्य जनांना अशा स्त्रीचे दर्शनही दुर्मिळ. जोगळेकरांनी या सामान्यांसाठी ही श्यामा सुन्दरी 'दीपावली'त उभी केली आहे (१९४९). निसर्ग-रम्य एकांतातील संकेताशिवाय प्रणय बहरत नाही. संस्कृत साहित्यात संकेत आणि संकेत-स्थले याचे केवढे तरी वैभवी साम्राज्य पसरले आहे. कमलिनीच्या समूहात हंसी कशी शांत बसलेली आहे असे वाक्य संस्कृत साहित्यात येते तेव्हा त्यात केवढातरी खोल संकेतार्थ असतो. या अर्थाचे सौंदर्यही जोगळेकरांनी 'दीपावली'त प्रकट केलेले आहे. (१९५१) एक स्त्री दुसरीसारखी नसते हे रसिक पुरुष जाणतात. संस्कृत साहित्याने या भेदाचे शास्त्र केलेले आहे. नाट्यशास्त्र,



अनुक्रमणिका

शृन्गारतिलक, शृन्गारमंजिरी, रसमंजिरी अशा ग्रंथातून या शास्त्राचे कणकण वेचून या सान्या नायिकांचे दर्शन जोगळेकरांनीच शृन्गारनायिका या लेखात दीपावलीच्या वाचकांना घडविले आहे. (१९५४) हे वर्णन एवढे लोकमान्य झाले की दलालांची चित्रे आणि हे वर्णन यांचा शृंगारनायिका हा ग्रंथच निघाला. मुद्रणाचा शोध लागल्यापासून आजतागायत मराठीत प्रसिद्ध झालेला हा सर्वात वैभवशाली ग्रंथ होय. या स्थानाला डळ लागण्याचा संभव नजिकच्या भविष्यात तरी नाही. या शृन्गारपूजेवरोवरच जोगळेकर 'दीपावली'ची इतर



अंगेही समृद्ध करीत होते. सह्याद्रीवरील त्यांचा ग्रंथ म्हणजे मराठीना अभिमान आहे. महाराष्ट्राची माता गोदावरी हिनेही जोगळेकर भारले गेले होते. आयुष्याच्या अखेरच्या दिवसात ते 'गोदावरी' या ग्रंथावर कष्टत होते. जो ग्रंथ केवळ तेच लिहू शकते अशा या महा-ग्रंथाचा पानशेताच्या प्रलयात विनाश झाला. 'दीपावली'त जोगळेकरांनी गोदावरीवर लिहिलेले लेख (१९५९) तेवढेच आता शिल्लक उरलेले आहेत. ते वाचले की आपण कशाला मुकलो याची मोठी खंत वाटते. जोगळेकरांची प्रगल्भ रसिकता सर्वगामी होती. खजूराहोच्या शिल्पाचाही परिचय त्यांनी 'दीपावली'तच करून दिलेला आहे (१९५९). अहिल्या (१९५३), वारियाने कुंडल हाले (१९५६), यथा काष्टंचकाष्टंच (१९५७), आणि प्रवृत्तिरेषा भूतानाम् (१९५८) या त्यांच्या चार कथांचा उल्लेखही इथ अपरिहार्य आहे. या प्रणयकथा असल्या तरी त्यांच्या नायिका या शृंगारनायिकाच आहेत. मराठीतील मस्त कथा अशी या कथांची कीर्ती आहे. या कथांना त्यांची मस्ती लाभलेली आहे ती जोगळेकरांच्या संस्कृत साहित्याच्या संस्कारातून लाभलेली आहे. त्या मर्यादेत त्या कथांचा उल्लेख इथे हवाच. त्यांनी 'दीपावली'त जे सौंदर्य ओतले आहे त्याला तोड नाही. त्यांच्या मृत्यूने 'दीपावली'त जाणवणारी पोकळी भरून निघणारी नाही.

## श्रद्धेय व्यक्तींची भावपूजा

जोगळेकरांसारख्याच घाईने दीपावली'ला पोरकी करून गेलेली दुसरी घरची व्यक्ती म्हणजे कै.गोपाल कृष्ण भोवे होत. भोवे यांचे 'दीपावली'तील कार्य प्रामुख्याने संगीतविषयक आहे त्यामुळे त्याचा पुरेसा परामर्श मला इथे घेता येणार नाही. 'दीपावली'चे सांस्कृतिक जीवन भरघोस करण्याची भोव्यांची कामगिरी ही डोंगराएवढी आहे. भारतीयांच्या देवता आणि महाराष्ट्रीयांची दैवते यांचा चित्रपरिचय 'दीपावली'ने करून दिला. यातील अधिकांश चित्रांवरील भक्तिपूर्ण भाष्य भोवे यांचे आहे. भोवे खरे भक्त होते. ते भक्तीत रंगले की स्वतःला विसरत. श्रद्धेने भारावलेल्या त्यांच्या रसवंतीचा प्रवाह हा गंगेचाच ओघ असे. प्रस्तुत लेखकाच्या अश्रद्धेने भोवे व्याकूळ होत. भोवे यांच्या श्रद्धेची बूज प्रस्तुत लेखकाकडे असे. भोवे यांच्या या श्रद्धाळू भावुकतेने मोहरलेले कितीतरी लेख दीपावलीत आलेले आहेत. ऋद्धिसिद्धीचा नायक सुखदायक भक्तांसी (१९५९) दुर्गतिनाशिनी दुर्गा (१९५९) आद्यशक्ती श्रीशिव (१९५९) कृपासागरा तुज विनवीतो (१९६०) भारताचे शक्तिस्थान (१९६०) हे चित्रांजली या पुस्तकात समाविष्ट असणारे त्यांचे लेख 'दीपावली'तच प्रकाशित झाले. नारद, व्यास, गौतमबुद्ध, ज्ञानदेव, कबीर, चैतन्यप्रभू, तुलसीदास, रामकृष्ण, शंकराचार्य, शिवाजी, रामदास, एकनाथ, तुकाराम, नृसिंह सरस्वती, हेही भोवे यांचे लेख 'दीपावली'तच प्रसिद्ध झाले (१९६०–१९६१). या सर्व श्रद्धेय व्यक्तींची भोवे यांनी बांधलेली भावपूजा अतिशय प्रसन्न अशी आहे. देवाभक्ताचे मेतकूट इथे क्षणात जमते आणि त्या भक्तिरसायनाच्या मनोज्ञ व पावन दर्शनाने वाचकही डोलू लागतो. भोवे यांच्या या सुन्दर लेखांचेच पुढे 'भारताचे भाग्यविधाते' हे पुस्तक प्रसिद्ध झालेले आहे. हे पुस्तक म्हणजे गद्य स्तोत्रांचा एक सुन्दर संग्रह आहे. ही स्तोत्रे जेवढी सुन्दर आहेत तेवढीच चीनने भारतावर आक्रमण केले तेव्हा त्यांनी 'महारुद्रा, तृतीय नेत्र उघडा' (१९६२) म्हणून रुद्रास मारलेली आवेशपूर्ण हाकही मनोज्ञ आहे. द्रौपदीच्या धाव्यातील करुणेशी रसदृष्टचा तोलेल असे हे वीररसाने उसळलेले रुद्रआव्हान रुद्रालाही हडबडून उठवील एवढे जिवंत आहे. जोगळेकर यांच्या स्थानाप्रमाणेच भोवे यांचेही स्थान 'दीपावली'त अजून मोकळेच आहे.

दिग्गजाच्या मानवंदनेच्या आरंभी गाथासप्तशती या प्राकृत ग्रंथाचा उल्लेख आलेला

आहे. येथून विदग्ध संस्कृताकडे वळण्या-आधी लोकगीते, लोककथा, लावणी, तमाशा इत्यादींशी संबंधित अशा लेखांचा आता विचार करू. इथे स्त्रीलेखकांची उपस्थिती बऱ्याच ठळकपणे जाणवते. 'मी नागिण तू केवडा' (१९५०) या श्रीमती शांता शेळके यांच्या लावणी वाङमयावरील लेखाच्या नांवातच प्रणयातील स्त्रीची आक्रमक वृत्ती मोठ्या कलात्मकतेने पकडलेली आहे. पंडित कवींना मान्य असणारे संस्कृत संकेत न पावणारे लावणीकार स्वतंत्र संकेतांनी कसे जिवंत वर्णन करतात याच्या या रस-ग्रहणात रसरशितपणा, जिव्हाळा आणि कणखर बेहोषी याचा प्रत्यय ओथंबलेला आहे. श्री. भा. श्री. परांजपे यांचा 'स्वकीया नायिका' (१९६२) हा लेख शाहिरी लावण्यातून अशा नायिकाचे जे दर्शन होते ते घड-विणारा आहे. जोगळेकरांच्या शृंगारनायि-कांची आठवण समर्थपणे या लेखाने होते. 'तमाशातील अश्लीलता' (१९५९) या श्री. नामदेव व्हटकर यांच्या लेखात लाव-ण्यांशी संस्कृत साहित्याशी तुलना केलेली आहे. लावण्यात अश्लील वाटणारे शब्दच संस्कृत साहित्यात प्रतिष्ठेचा बुरखा पांघरून येतात. नागर वाचकाला रसास्वादासाठी जशी या शब्दाची जरूर असते तशीच लाव-णीच्या विशिष्ट आस्वादकाला वरकरणी अश्लील वाटणाऱ्या त्याच परिचित शब्दांची जरूर असते असे प्रतिपादन या लेखात आहे. प्रा. ल. ग. जोग यांचा 'अश्लील वाङमयाचे रसग्रहण' (१९५९) हा लेख जे साहित्य एखाद्या दुसऱ्या शब्दाने अश्लील वाटते तेही इतर नानाविध साहित्य सौंदर्यांनी कसे विनटलेले असते हे सोदाहरण सिद्ध कर-णारा आहे. प्रा. वि. म. कुलकर्णी यांचा 'प्राचीन वाङमयातील कौटुंबिक जीवन' (१९६७) हा लेख शाहीर आणि संत याच्या वाङमयातील कौटुंबिक चित्राचे रेखाटण करणारा सुन्दर ललित निबंध आहे. 'घ्या लवंग सुपारी राया पाने पिकली' (१९५७) या श्री. वसंत सवनीस यांच्या विनोदी लेखात भारतीय संस्कृतीतील तांबुलाचा खुसखुशीत परिचय करून दिला आहे त्याचाही उल्लेख इथेच करतो.

## चावटपणा–अश्लीलता नव्हे !

तमाशातील चावटपणा हा अपरिहार्य असतो. ते त्याचे अंगच असते. चावटपणा–अश्लीलता नव्हे–हा साहित्याचा एक रंजक गुणही असतो. संस्कृत साहित्य चावटपणा-लाही पारखे नाही. मूळ संस्कृतातील अशा एका चावट कथेचा परिचय 'कहाणी नितंब-वतीची' (१९६८) या कथेत श्री. आनंद साधले यांनी करून दिलेला आहे. मूळ संस्कृतातील नव्हे पण स्वतःच्या शैलीने संस्कृताची आठवण करून देणारी अशीच एक कथा–'कान्ता वरयते वित्तम्' (१९६९) डॉ. शामसुन्दर रघुवंशी या विद्वान पंडितानी लिहिलेली आहे. चावट-पणाचे वावडे स्त्रियांनाही नसावे–डॉ. रघु-वंशी यांच्या आधी त्याच शैलीच्या–म्हणजे संस्कृत चावटपणाची आठवण करून देणाऱ्या, 'क्षुधातुराणाम् न रुचिर्नवेळा' (१९६४), 'अश्वमुद्रा' (१९६३), शून्या-पत्ती (१९६१) या कथा डॉ. दमयन्ती सर-पटवार या विदुषीने लिहिल्या आहेत. डॉक्टर सरपटवार यांचा उल्लेख डॉक्टर रघुवंशी यांच्या आधी येणे काल व गुण या








दृष्टीने जरूर होते. परंतु दोन पुरुषांच्या मध्ये चेमटले जाण्याचा चावटपणा त्यांना अन्याय्य ठरता, शिवाय खास प्रस्तावाने त्यांचा उल्लेख करण्याजोगी त्यांची प्रतिष्ठा होती म्हणून त्यांचा उल्लेख राखून ठेवला.

या दोन डॉक्टरांच्या नंतर प्रणाम करावयाचा तो तिसऱ्या एका डॉक्टर विदुषीना. या म्हणजे डॉक्टर कुमारी सरोजनी वाबर या होत. यांनी आपले अमोल आयुष्यच लोकगीताच्या कारणी लाविले आहे. विस्मृतीत नाश होत असणारी मराठी लोकगीते त्या सतत तपस्येने पुनरुज्जीवित करीत आहेत. मराठी माउलीचे केवढे तरी उपेक्षित सौंदर्यभांडार त्यांनी प्रकाशात आणले आहे. मराठीचे प्रेम असणाऱ्या प्रत्येक माणसाने विनम्र व्हावे अशी ही तपस्या आहे. सरोजनीबाईनी त्यांच्या तपस्येची अनेक रसाळ फळे 'दीपावली'त प्रकाशित केलेली आहेत. 'राहिलें दारवंटा' (१९६४) मध्ये त्या विठूदेवाच्या भक्तीच्या ऊर्मीचे दर्शन घडवितात. 'लोकगीतातील स्वागत' (१९६०)-मध्ये जानपद स्वागताची हार्दिकता दाखवितात. 'सीतेचा ववसा आला नगरी, (१९६४) मध्ये संक्रांतीच्या सणाचे, आली वर्षाची पंचिम (१९६४) मध्ये नागपंचमीच्या सणाचे, गौरादेवी दार उघड (१९६९) मध्ये हळदीकुंकवाच्या प्रथेचे लोकगीताच्या आधारे सुन्दर वर्णन त्यांनी केले आहे. त्यांच्या या साऱ्या लेखांचा पिंड लोकगीतासारखाच सुबोध, रसरशीत आणि भावसिक्त आहे. याशिवाय 'चांदणारी चांदणी' (१९६६) मध्ये त्यांनी एक लोककथा स्वतःच्या रसाळ शैलीत सांगितली आहे. 'तमाशातील गणगौळणी' (१९६१)-मध्ये एका तमाशाचे रसग्रहण केले आहे आणि 'माझा मराठाचि बोलु कवतिके' मध्ये (१९६१) मराठी भाषा सिंहासनावर बसली त्या निमित्ताने तिची कहाणी जुन्या कवीच्या शब्दात सांगितली आहे.

श्रीमती दुर्गा भागवत यांनीही स्वतःच्या विदग्ध आणि रसगंभीर शैलीने घडविलेल्या भूषणांनी 'दीपावली'ला नटविली आहे. 'जंगलातील यौवनोत्सव' (१९५१) मध्ये सूर्याशी पृथ्वीचे लग्न झाले त्यानिमित्त गोंड लोक जो हुलगीचा उत्सव करतात त्यात प्रकट होणाऱ्या गोंडाच्या नितांत काव्यात्म वृत्तीचा परिचय घडविला आहे. 'असंच एक आटपाट नगर होते' (१९५२)-मध्ये ब्राम्हणी समाजाला माहीत नसणाऱ्या लोककथातील सौंदर्य प्रकट केले आहे. या लोककथा अद्भूतता विशाल करणाऱ्या, वेगळ्या नीतिकल्पना गोंजारणाऱ्या, अजब तर्कशास्त्र शिकविणाऱ्या अशा आहेत. 'गंगा सुरावंती' (१९६०) मध्ये धनगरी समाजातील लोककथेच्या आधारे रामसीतेच्या पूर्वजन्माची कथा सांगितली आहे. दुर्गाबाईंकडे अशा प्रकारचे अथांग भांडार आहे. गंभीर संशोधनात त्यांनी जीवन गुतविले असल्यान सामान्य वाचकाची उपासमार त्या करीत करीत आहेत अशी तक्रार इथे आपुलकीच्या हट्टाने करावीशी वाटते.

हा विषय सोडन पुढे जाण्याअगोदर आता न विसरता अत्यंत आदराने उल्लेख केला पाहिजे तो प्राध्यापक म. वा. धोंड यांच्या 'डोळे मोडित राधा चाले' (१९६७) या अप्रतिम लेखाचा. 'दीपावली'तील फक्त दहाच लेख निवडावयाचे म्हटले तरी त्यात या लेखाचा समावेश अटळ आहे. वृत्तीने

[पृष्ठ ५९ वर]

इन्शुअर्ड पेटीच्या सोयीमुळें तुम्हाला आपले जड-जवाहिर, नाणी दागिने वगैरे मौल्यवान् वस्तू जहाजानें किंवा विमानानें परदेशीं पाठविणें शक्य झालें आहे. विमा उतरवलेली ही पेटी आमच्या ठराविक अटींप्रमाणें असावी. निर्यातीसाठीं रिझर्व बँकेची अगाऊ-परवानगी आवश्यक आहे.

# निर्यातदारांनो !

## तुमच्या मौल्यवान् वस्तू

### इन्शुअर्ड पेटींच्या पद्धतींतून परदेशांत

# सु र क्षि त प णें

पाठवा.

| | | |
|---|---|---|
| **वजन :** किमान ८ मिलिमिटर जाडीच्या फळीच्या किंवा पत्र्याच्या या पेटीचें मालाकार वजन १ किलोहून आधिक नसावें | **आकार :** लांबी जास्तींत जास्त ३० सें. कंदी जास्तींत जास्त २० सें. उंची जास्तींत जास्त १० सें. | **आंत :** खुला इन्व्हॉईस व पत्ता |
| **कागदपत्रें :** कस्टमचें घोषणापत्र व इतर निर्यात कागद | **बंदी** (अ) चलनी व बँकनोटा, बेअरबूके अथवा इतर सेक्युरिटीज पाठवूं नका (ब) चालूं किंवा वैयक्तिक पत्रव्यवहाराच्या स्वरूपाचे कागदहि पाठवूं नका. | **हंशील** २५० ग्रॅम वजनापर्यंत ३ रू. त्यानंतरच्या प्रत्यके ५० ग्रॅमला ६० पैसे रजिस्ट्रेशन ७५ पैसे, विमा : प्रत्येक ५०० रू. ना १.२५ रू. एअरमेल साठीं अधिक आकार अगाऊ भरावा लागेल. तो गंतव्य स्थानापर्यंत पत्राच्या दराप्रमाणें आकारला जाईल. |



**भारतीय टपाल आणि तार खातें**

davp 69/91








अनुक्रमणिका

श्वास रोखून
धरणाऱ्या अद्भूत व
चित्तथरारक
कादंबरिकेचा उत्तरार्ध

—नारायण धारप



....व्हेंटिलेटरच्या कडेवरून हळुहळु सरकत सरकत तो खिडकीपाशी आला—अजिबात आवाज न करता.... चंदूच्या कॉटच्या रोखाने तो येत होता नि भर्भीती चंदूचं सारं लक्ष त्याच्यावरच एकवटलं होतं....




[ ४ ]

आजवर त्याने आबासाहेबांकडच्या पत्रांची इतक्या आतुरतेने कधीच वाट पाहिली नव्हती. त्याला काळजी कशाची वाटत होती हे शब्दात सांगताच आलं नसतं; पण त्याच्या नजरेआड ज्या काही लहानसहान घटना घडत असतील त्यांची त्याला इत्यंभूत माहिती हवी होती. आबासाहेबांची (कोणाकरवी तरी लिहवून घेतलेली) पत्रं येत होती. दिवसेंदिवस पत्रांची भाषा जास्त जास्त निराश होत होती. त्यांचा धीर खचत चालला होता हे अगदी उघड होतं. पण त्याला ज्याची भीती वाटत होती त्याला पाठिंबा देणारा एक लहानसा उल्लेख त्याला त्यांच्या एका पत्रात सापडला

"उजव्या हातासंबंधी मी मागे तुझ्याशी बोललो होतो ना? चंदू, मला जी शंका आली होती ती निराधार नव्हती. डॉक्टरानी एवढ्यातच तो हात पाहिला आहे; त्यांनाही त्यातला फरक आता दिसायला लागला आहे; मला तो हात जड का वाटत होता हे आता समजलं; त्या हातातल्या सर्व नसाच निर्जीव होत आहेत. मला तर काहीच दिसत नाही, पण जडपणा मात्र चांगला जाणवतो. दुखण्याचीच ही एखादी पुढची पायरी असावी असे वाटतं. जे जे वाट्याला येईल ते ते निमूटपणे सहन करायला हवं

चंदूच्या मनात या मजकुराने अस्वस्थतेची जरा खळबळ माजली. प्रसंग अजून निश्चित दिशा घेत नव्हते पण त्या हातातला फरक आता इतरांनाही स्पष्ट दिसायला लागला होता तर! इतर काही तरी तिकडच्या पत्रांबद्दलची त्याची उत्सुकता मात्र या पत्राने आणखीच वाढली. पुढच्या पत्राने तर त्याला चांगलाच धक्का दिला

चंदू, डोळे तर गेलेच आहेत आता हातही जाणारसं दिसतं, निदान एक, उजवा, तरी जाणारच आहे. उजव्या हाताच्या बोटात गँग्रीन डेव्हलप झालं आहे असं डॉक्टर म्हणतात; मनगटापासून







अनुक्रमणिका

पुढचा पंजा ॲम्प्यूटेट करणं हा एकच उपाय त्यांना दिसतो. नाहीतर त्यांच्या मते सर्व हातच ॲफेक्ट होईल ... काय काय विटंबना होईल ती पहात रहायची ... एवढ्यात वेळ मिळाला तर जरूर भेट देऊन जा. आता आमचे काही फार दिवस उरलेले नाहीत.

त्या चमत्कारिक उजव्या हाताचा विचार चंदूच्या मनात सारखा येतच होता. होतं आहे ते बरंच होत आहे असं त्याला वाटलं. हातातल्या त्या अनैसर्गिक वास्तव्याने (पण ते तिथे कसं सामावलं असेल हे मात्र त्याला काही केल्या उमजेना!) हातात असा दोष उत्पन्न झाला असावा अशी त्याची समजूत होती. एकदा डॉक्टरांनी तो पंजा तोडून टाकला की त्याला आता होणारा रक्त आणि शक्ती यांचा पुरवठा आपोआप बंद पडेल आणि मग तो पंजा (व त्या-बरोबरच त्याच्यातली दुष्ट प्रेरणा) झडून, वाळून नाश होऊन जाईल अशी त्याला आशा वाटत होती. पण आशाच, खात्री नाही. या प्रकरणात कशाचीच खात्री देता येत नव्हती.

कशी तरी सवड काढून त्याने त्यापुढच्या रविवारी आबा-साहेबांकडे एक चक्कर मारली. त्यांच्यातला बदल पाहून तर त्याला धक्का बसलाच, पण त्याहीपेक्षा त्यांचा उजवा हात पाहून त्याच्या सर्व शरीरावर घृणेचा एक शहारा उमटून गेला. तो हात जरासा सुजला होता, रंग मातट, निळा-काळा वाटत होता. त्यावरच्या शिरा जळजळीत दिसत होत्या. एकूण दृश्यच रोगट, सडके, किळस-वाणं दिसत होते. आबासाहेबांना दृष्टी नाही याचा चंदूला तेवढ्या-पुरता तरी आनंद झाला. हे पहायला तरी नको! चंदूला कल्पना नव्हती की ऑपरेशन दुसऱ्याच दिवशी ठरवलं आहे. संध्याकाळी तो जेव्हा आबासाहेबांच्या खोलीत गेला तेव्हा त्याला हे समजलं. मनाशीच त्याने ठरवलं की रजा एक दिवस वाढवून घ्यायची आणि एकदा हे पार पडलं की मग जायचं. "मीच त्यांना सांगितलं की लवकर उरकून टाका–" आबासाहेब म्हणत होते. "तशी वेदना फारशी होत नाही, जवळजवळ नाहीच म्हण ना! पण असला सडका अवयव अंगावर हवा कशाला?" त्यांनी डाव्या हाताने उजवा हात धर-ण्याचंही सोडून दिलेलं दिसलं. त्यांनाही स्पर्शाची शिसारी वाटत होती का कोण कोणास ठाऊक! पण त्या निळसर-काळ्या, सुजलेल्या बोटांची हालचाल सुरूच होती. अजून तरी त्यांच्यातली ती अघोरी चेतना नाहीशी झाली नव्हती. आताच्या क्षणी त्या बोटात पेन्सील दिली तर ती काय लिहीतील असं एक अनैसर्गिक कुतूहलही चंदूच्या मनात होतं. या विचाराबद्दल त्याला स्वतःचंच नवल वाटलं, पण त्याचा आपल्या विचारांवर ताबा थोडाच होता!

आबासाहेब थकलेले होते, त्यांना मधून मधून एक डुलकीही येत होती. अशा एका संधीचा फायदा घेऊन चंदूने कागद पेन्सील हळूच त्या हाताकडे सरकावली. बोटांनी पेन्सील चट्दिशी उचलली आणि कागदावर भराभर शब्द लिहायला सुरुवात केली.

चंदू. चंद्रकांत. शहाणा चंदू. काही दिवस थांब. मग तुझी माझी भेट होणारच आहे. आता थोडेच दिवस राहीले आहेत

आबासाहेब जरा हलताच बोटं निर्जीव झाली होती, पेन्सील गळून पडली होती. चंदू त्या चमत्कारिक शब्दांकडे चकित होऊन पहात होता. त्याच्या नाशाची वेळ जवळ आली असताना पुढच्या भेटीच्या गोष्टी तो कशा करतो? का त्याला कशाची कल्पनाच नाही? का त्याने आणखीच एखादं राक्षसी कारस्थान शिजवून ठेवलं आहे? चंदूला संताप याचा येत होता की त्याची इच्छा नसतानाही त्या पंज्याने चंदूला आपल्या कटात एक सहकारी म्हणून गोवलं होतं. आता चंदूला आपली चूक उमजली. ज्यावेळी त्याने प्रथम हा प्रकार पाहिला तेव्हाच त्याने तो आबासाहेबांना निदान त्यांच्या डॉक्टरांना सांगायला हवा होता. तेव्हा तो गप्प का बसला? आता त्याचं तोंड कायमचं बंद झालं होतं.

ऑपरेशन दुसऱ्या दिवशी दुपारी झालं. आबासाहेब ऑपरेशनला भीत तर नव्हतेच; उलट उतावळेच झाल्यासारखे दिसत होते. त्यांच्या उतावळेपणामागचं (निदान एक तरी) कारण चंदूला माहीत होतं. आबासाहेबांना या प्रकाराची थोडीफार कल्पना आली होती आणि असला हा किडका हात केव्हा छाटला जातो यासाठीच ते अधीर झाले होते.

प्रत्यक्ष ऑपरेशनला वीसएक मिनिटंच लागली असतील. आवश्यकता वाटली तर रक्त द्यायचीही सर्व जय्यत तयारी ठेवण्यात आली होती. पण ती वेळ आलीच नाही. ऑपरेशननंतर चंदू डॉक्ट-रांना भेटला. आबासाहेबांना आता त्यांच्या खास खोलीत हलवलं होतं. डॉक्टरनी अंगावरचा ॲप्रन; मास्क इत्यादी उतरवून ठेवलं होतं. पण हातातले रबरी मोजे मात्र तसेच ठेवले होते. चंदू जवळ गेला तेव्हा त्याला दिसलं की डॉक्टर आपल्या हातात आबासाहेबांचा कापलेला पंजाच घेऊन तो उलटासुलटा करून पहात होते. या अनपेक्षित दृश्याने चंदू एकदम हबकलाच. त्याच्याकडे पाहून जरा हसत डॉक्टर म्हणाले,

"या–या–आबासाहेबांचे नातू नाही का तुम्ही? काही काळ-जीचं कारण नाही बरं का! मला वाटलं त्यापेक्षा केस फारच सोपी गेली –" पण चंदूला त्यांच्या आवाजातला एक प्रश्नार्थक अनिश्चित-पणा जाणवला.

"नेहमीपेक्षा काही वेगळं दिसलं का आपल्याला?"

"शरीर म्हणजे काही यंत्र नाही–त्याला हार्ड अँड फास्ट नियम थोडेच आहेत? पण–पण–यस्! आय वॉज सरप्राइज्ड्!

"कसं काय?" (हे सर्व चंदूला अपेक्षित होतं!)

"हा हात पाहीलात का?" तो घाणेरडा पंजा त्यांनी पुढे केला. चंदू अंग चोरून एकदम मागे सरला. डॉक्टर हसले. "सॉरी–आमच्या-सारखी तुम्हाला याची सवय थोडीच असणार! खूप ब्लीडिंग होईल असं वाटलं होतं मला–पण काहीही झालं नाही! नर्व्हज् तर गेल्याच होत्या, पण इतर सर्व सिस्टीमसुद्धा कंप्लीट ॲट्रोफाइड होत्या! यू नो, काहीकाही वेळा शरीर ग्राफ्ट ॲक्सेप्ट करीत नाही. रिजेक्ट करतं अगदी तसाच हा प्रकार वाटला ... हा हात त्यांच्या शरीराला एखादी फॉरिन बॉडीच वाटला की काय कोणास ठाऊक! बरं झालं

हे वेळेवरच केलं . . . आता आबासाहेब व्यवस्थित होतील . . . काही काळजी नाही !"

त्यांनी तो निळाकाळा, सुजलेला, निर्जीव पंजा कोपऱ्यातल्या एनॅमल बकेटमधे टाकून दिला आणि ते हात धुण्यासाठी बेसिनकडे वळले. चंदू काही क्षण त्या निर्जीव अवशेषाकडे पहात राहिला. आता पुढे काय करायचं हेच त्याला समजत नव्हतं. कोणत्याही रहस्याचा उलगडा झाला नव्हता पण सर्व मार्ग एका बंद तोंडाशी होते. त्याच्या मनाचं मुळीच समाधान झालं नव्हतं; पण त्याला काहीच करता येण्यासारखं नव्हतं. अशा विमनस्क अवस्थेतच तो थिएटरमधून बाहेर पडला.

आबासाहेब तासाभराने शुद्धीवर आले. पंजा नाहीसा झालेला हाताचा पुढचा भाग पांढऱ्याशुभ्र बँडेजमधे होता. आबासाहेबांनी डाव्या हाताने तो बुडखा एकदोनदा चाचपून पाहिला आणि समाधानाचा एक मोठा सुस्कारा सोडला. त्यांच्या कॉटभोवती जमलेल्या अनेक माणसांपैकी फक्त चंदूलाच त्यांच्या समाधानाचा खरा अर्थ समजला. आणि एकूण प्रकार पाहिल्यावर त्यांची सुटकेची भावना अवाजवी होती असं त्यालाही म्हणता आलं नसतं. आबासाहेब नीट शुद्धीवर येऊन बोलायला लागले तेव्हा मग चंदूने त्यांचा निरोप घेतला. घरच्या गाडीच्या सारख्या चकरा चालूच होत्या. त्याच गाडीने तो घरी आला आणि आपलं सामान आवरून त्याने रात्रीची गाडी पकडली.



[ ५ ]

गावी पोचायला पहाट झाली. झोपेची विलक्षण जरुरी भासत होती, पण एकदा डोळे मिटले की सारा दिवस फुकट जायची भीती होती. तेव्हा आल्यावर गार पाण्याने तोंड धुवून आणि कडक चहाचा कप घेऊन त्याने डोळ्यावरची झोप शक्य तेवढी उतरवण्याचा प्रयत्न केला. आदल्या दिवसापासून गोपाळ त्याची वाटच पहात होता. चंदूचा मुक्काम वाढला तशी त्याला तर अशी भीती वाटत होती की आबासाहेबांचंच दुखणं विकोपाला गेलं की काय–पण तसं काही नाही हे पाहून त्यालाही जरा बरं वाटलं.

गोपाळ चंदूपेक्षा जास्त उत्साही आणि उद्योगी होता. भल्या पहाटे उठून तो बॅडमिंटन खेळायला जायचा, तिथून परत आला की घाईघाईने दाढी, आंघोळ इत्यादी उरकून रशियन भाषेच्या क्लासला जायचा, मग तिथून खानावळीत व तेथून परस्पर ऑफिस येतानाही असे अनेक व्याप सांभाळीत रात्री जेवण वगैरे उरकून स्वारी खोलीवर हजर व्हायची. त्याच्या मानाने चंदूला आळशी-गोटाच म्हणायला हवं. सकाळी खोलीतल्या खोलीतच तो काय तीसचाळीस नमस्कार घालील तोच काय तो त्याचा दिवसभरातला व्यायाम. दिवसाचा उरलेला रिकामा वेळ तो रेडियो ऐकणे, कोणाकडे तरी पत्त्याचा डाव टाकणे किंवा रहाता राहिला सिनेमा–असल्या उद्योगात घालवीत असे. चंदू व गोपाळ दोघंही समाधानाने एकत्र रहात होते कारण दोघांनीही एकमेकाला कोणताही उपदेश करण्याचा प्रयत्न केला नव्हता.

चंदू येताच दोघांचा चहा झाला आणि गोपाळ खेळायला निघून गेला. चंदूने दाढी उरकली आणि आंघोळीचं पाणी स्टोव्हवर तापेपर्यंत तो पेपर चाळत बसला. आंघोळीत त्याने बराच वेळ घालवला–प्रवासाचा शिणवटा भरपूर गरम पाण्याने जातो असा त्याचा अनुभव होता. मग स्वतःशी गुणगुणत तो खोलीत आला, केसांना तेल लावून भांग पाडण्यासाठी तो टेबलापाशी उभा राहिला. भांग पाडून होईपर्यंतही त्याचं लक्ष टेबलावरच्या त्या कागदाकडे गेलं नाही. कंगवा ड्रॉवरमधे ठेवून ओल्या टॉवेलला हात पुसता पुसता त्याने खाली पाहिलं तेव्हा त्याला तो कागद दिसला. कागदावर तीनचारच ओळी लिहिलेल्या होत्या, पण त्या वाचतावाचताच चंदूची गुणगुण एकदम थांबली, बाकीची सारी हालचालही थांबली, एकदम स्तब्ध होऊन तो डोळे विस्फारून कागदावरच्या त्या तीन-चार ओळींकडे पहात राहिला. विश्वास न बसल्यासारखा. कागदावर (त्याला सहज ओळखू येण्यासारख्या अक्षरात) एवढंच लिहिलं होतं :

चंदू, मी म्हटलं होतं ना आपली भेट लवकरच होणार आहे म्हणून ? मी तुझ्याबरोबरच इथे आलो आहे. कसा आलो हे जाणायला उत्सुक असशील नाही ? जरा शक्ती आली की सगळं सांगेनच. तोपर्यंत नमस्कार. अक्षरांचा अर्थ समजायला एक सेकंदही लागला नाही. पण त्या अर्थामागचा अर्थ समजणं अवघड गेलं. त्या चार ओळींनी

त्याच्या अनेक कल्पना खोट्या पाडल्या होत्या, त्याच्या मनाचं सर्व समाधान हिरावून घेतलं होतं – त्या चारच ओळींनी अनेक गोष्टी उघड केल्या होत्या . आबासाहेबांचा तो हात कापून टाकला तरी त्यातली घातकी शक्ती नष्ट झाली नव्हती; त्यातली स्मृती तशीच कायम होती; आणि आणखी वाईट गोष्ट म्हणजे इतके दिवस तो हात आबासाहेबांच्या शरीराला जखडला होता तो आता मुक्त झाला होता – स्वैरसंचाराचं त्याला स्वातंत्र्य मिळालं होतं – आणि चंदूचा मागोवा घेत घेत तो आता इथे हजर झाला होता ! घटना काय झाल्या हे निदान समजू तरी शकत होतं – पण त्या कशा झाल्या याचा उलगडा कसा होणार ? आजवर कोणीही न अनुभवलेले हे प्रसंग – त्याला कोणते नियम लावणार ? जी गोष्ट मुळातच अनैसर्गिक होती, तिला निसर्गाचे कोणते नियम लावणार ?

क्षणभर त्याची विचारशक्तीच गोठल्यासारखी झाली. शरीर आणि मेंदू, दोन्ही सुन्न झालेसे वाटले. पण या निष्क्रीयतेचा चुराडा करणारा एक विचार धगधगत मनात आला – तो पंजा इथे होता ! या खोलीत होता ! चंदू दचकून टेबलापासून मागे सरला आणि त्याची नजर सगळ्या खोलीवरून भिरभिर फिरली. निळ्या-काळ्या, सुजलेल्या बोटांचा, वरच्या शिरा टरारून फुगलेला, तो घाणेरडा पंजा इथेच कोठेतरी आहे, या निव्वळ कल्पनेनेच त्याच्या अंगावर शिसारीचा काटा आला. कोठे असेल तो ? फळीवरच्या सामानामागे ? फडताळाच्या एखाद्या कप्प्यात अगदी मागे ? टेबलाच्या एखाद्या खणात ? कॉटखालच्या ट्रंकेत ? लपायला जागा तर असंख्य होत्या खिडकीच्या दाराची जरा खडखड होताच चंदू केवढ्यांदा तरी दचकला . . मग त्याला दिसलं की वाऱ्याने खिडकीचं दार हललं होतं पण आता हा धसका कायमचाच होता. . . . खोलीत जरा जरी खुडबुड झाली की त्याचं शरीर भयाने एकदम ताठ होईल . . शरीरातल्या नसानसा विजेचा धक्का बसल्यासारख्या थरथरायला लागतील . त्याला एका सेकंदाचीही निश्चिती मिळणार नाही . . . तो पंजा शोधून काढून त्याचा नायनाट करीपर्यंत ! शेवटी तो निर्णय त्याला घ्यावाच लागला. आता जरी नाही तरी सवड काढून त्याला खोलीचा इंच न् इंच तपासावा लागणार होता, एखाद्या मुक्या जनावरासारखा सांदीकोपऱ्यात कोठेतरी दडून बसलेला तो पंजा हुसकून बाहेर काढावा लागणार होता आणि त्याचा नाश करावा लागणार होता . . खरं म्हणजे घाणेरडं काम, पण आता अपरिहार्यच झालेलं !

आता तर त्याला या उचापतीला वेळही नव्हता आणि रात्रभराच्या प्रवासाने इतका थकला आला होता की शरीरात त्राणही नव्हतं. ऑफिसमधून परत आल्यावर मग काय करायचं त पाहू असा त्यानें विचार केला. खरोखर त्याला मनातून या सर्वच प्रकाराचा संताप आला होता, पण तो उघड करण्यातही काही अर्थ नव्हता. त्याने खोलीभर एकदा अनिश्चितपणे नजर फिरवली आणि तो जरा मोठ्या आवाजात म्हणाला, "ठीक आहे – संध्याकाळी पाहू काय ते —"

चंदू कामावरून परत आला तेव्हा गोपाळ अर्थातच घरी नव्हता. तो एकदम रात्रीच परत येणार होता. सर्व दिवसभर चंदूच्या मनातून त्या पंज्याचा विचार हललाच नव्हता. हे प्रकरण पुढे कसं काय वळण घेणार आहे याची त्याला काहीच कल्पना येत नव्हती. पण त्यातला एक भाग तर त्याला आल्या आल्याच दिसला. टेबलावर त्याच्यासाठी आणखी एक पत्र होतं. दुपारी केव्हातरी तो पंजा आपल्या लपायच्या जागेतून बाहेर आला होता, मग (तो हालचाल तरी कशी करीत असेल ?) टेबलावर चढला होता आणि तिथल्याच कागदावर त्याने आपलं पत्र लिहून ठेवलं होतं:

"चंदू, माझ्या आगमनाची वस्तुस्थिती तू आता मान्य केली असशील अशी मला आशा आहे. काही गोष्टींचं स्पष्टीकरण केलं म्हणजे तुझ्या मनातल्या शंका जातील असं वाटतं. तुझे हे आबासाहेब स्वभावाने जरा धाडसी खरे, पण त्यांना सारासार विचार जरा कमीच. त्यांना अनेकांनी सूचना देऊनसुद्धा त्या त्यांनी ऐकल्या नाहीत आणि एका फार प्राचीन इमारतीतलं एक बंद कपाट उघडलं. ते कपाट उघडण्याचा अधिकार काही अगदी खास लोकांनाच आहे. जर काही कमीजास्त झालं तर त्याला कसं तोंड द्यायचं याचं ज्ञान या खास लोकांनाच आहे. आबासाहेब त्या बाबतीत अगदीच अनभिज्ञ होते. वैयक्तिक धैर्याचा हा प्रश्नच नाही. काय झालं ते त्यांना समजलंच नाही अनंत काळपर्यंत त्या कपाटात डांबला गेलेला मी त्या क्षणी मुक्त झालो . . चंदू, मी कोण आहे, मला कोणी व कां जखडून ठेवलं होतं यावर फार विचार करत बसू नकोस. तुला त्यात काहीएक कळणार नाही. काहीतरी अर्धवट समजलंच तर त्या भयानक ज्ञानाने मेंदूच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडतील. एवढं ध्यानात घे की माझी सुटका झाली पण हा आगीतून निघून फुफाट्यात पडण्यासारखाच प्रकार होता . . आबासाहेब अनभिज्ञ असले तरी अतिशय खंबीर मनाचे होते . . एका पिंजऱ्यातून सुटून मी दुसऱ्या पिंजऱ्यात सापडलो होतो ! माझी आबासाहेबांवर कोणतीही मात्रा चालली नाही – अगदी शेवटपर्यंत नाही. आणि त्यांच्या आजारात मला संधी मिळाली नसती तर . . तर कोणास ठाऊक काय झालं असतं ! पण ते आजारी पडले, त्यांच्या मनाची उभारी खचली आणि मला त्यांच्या उजव्या हातात प्रवेश मिळाला. पुन्हा एकदा,

हे कां व कसं यावर डोकं तापवत बसू नकोस. आबासाहेब अंध होते हे एकप्रकारे माझ्या फायद्यावरच पडलं. त्याना उजव्या हातातला फरक जाणवत होता, पण समजत नव्हता. अर्थात माझ्यासाठी ही तात्पुरती व्यवस्था होती. आबासाहेबांचा मृत्य आता जवळ आला आहे—त्यांच्या मृतदेहाबरोबर मला जळून खाक व्हायचं नव्हतं. मी यासाठी उपाय योजत असतानाच तुझी गाठ पडली. तू या प्रकारावद्दल कोणाशी काही बोलतोस की काय हे मी अगदी लक्षपूर्वक पहात होतो, पण तू गप्प बसलास आणि मला धीर आला. मी पुढचं पाऊल ( ! ) उचललं. त्यांच्या हाताच्या रक्तवाहिन्या आणि नसा निर्जीव करणं हे सोपं काम होतं. हाताचं मास गॅंग्रीनस (हाच शब्द ना ? डॉक्टरांच्या तोंडून मी ऐकला आहे ! ) करणंही सोपं होतं. मला हवा तो निर्णय त्यांनी घेतला. हात शरीरापासून कापून काढायचं ठरवलं. सर्व काही ठरवल्याप्रमाणे पार पडत होतं. एकदा त्यांच्या शरीराचं लोढणं दूर झालं की मी सरळ तुझ्याकडच येणार होतो—पण तूच स्वतः हजर झालास ! परिस्थितीच माझं काम सोपं करीत होती तर ! त्या एनॅमल बादलीतून मी बाहेर आलो, कॉरीडरमधून अंधाराचा फायदा घेऊन आबासाहेबांच्या खोलीत आलो आणि तिथल्याच एका बॅगमधून त्यांच्या घरी आलो. आणि तेथून तुझ्या बॅगमधूनच तू मला तुझ्या घरी घेऊन आलास. किती सोयीस्कर प्रवास !

या साऱ्या धडपडीमागे माझा हेतू काय आहे असा तुला प्रश्न पडेल. तुला आवश्यक आहे तेवढी माहिती देतो. फार फार पूर्वी (किती वर्षांपूर्वी ते मला आता आठवत नाही) माझ्यावर एक फार मोठा अन्याय झाला आहे. तथाकथित देवमार्गी माणसानी मला फसवून कोंडून घातलं आहे. माझा नाश त्यांनाही शक्य झाला नाही. आता मी परत पृथ्वीतलावर आलो आहे. त्यांच्यापैकी काही किंवा सगळे अजूनही इथे असतील (तुला हे कळणार नाही पण आम्ही सतत हजर असतो—रूप, नाव, देश बदलतो पण आयुष्य अखंड असते) तर त्यांच्यावर सूड उगवायचा आहे. कितीतरी वर्षांनी मलाही एकमेव संधी मिळत आहे. ती मी वाया दवडणार नाही. तू मला मदत करू शकशील. तुझाही त्यात फायदा आहे. तुझ्या स्वप्नातही कधी आली नसेल अशी सत्ता, संपत्ती, कीर्ती तुझ्या पायाशी लोळण घेईल. तू सर्वशक्तीमान होशील.

हे मी कसं करणार आहे ? वाच. तुझी संमती मिळाली (ती मिळणारच ! ) की मी तुला काही कला शिकवणार आहे. काही नव्या क्षेत्रात तुझा प्रवेश होणार आहे. या साधननंतर तुझं शरीर योग्य होईल, त्यात आवश्यक ती क्षमता येईल, माझं अस्तित्व सहन करायची शक्ती येईल... आणि मग मी तुझ्या शरीरात प्रवेश करणार आहे. ही कल्पना तुला असह्य वाटेल, पण घावरण्याचं काहीही कारण नाही. संघर्ष होण्याचं काहीही कारण नाही. मी तुझ्या शरीरात मित्र, साहाय्यक, भागीदार म्हणून येत आहे—कोणी शत्रू किंवा आक्रमक म्हणून येत नाही. एकदा मी त्या शरीरात आलो की त्याच्यातील सुप्त शक्ती सचेतन होतील. ते एक अविनाशी नवल होईल. त्याच्या अमर्याद शक्तीला कशाचाही अटकाव रहाणार नाही आपण शब्दशः सार्वभौम होऊ ! ही देणगी मी तुला स्वखुषीने देत आहे, पण

पण जर पापपुण्याच्या काही भ्रामक समजुतीखाली तू मला सहकार्य द्यायला नकार दिलास तर मग मला हवे ते मी हक्काने घेईन. लक्षात ठेव, मला अशक्य असे काही नाही. देवाधर्माच्या गोष्टी सर्व थापा आहेत. भोळसटांनी त्यांना जरूर भुलावं. जग हे उपभोगासाठी आहे, त्यागासाठी नाही. आणि मानव हा त्याचा स्वामी आहे, त्याचा तो हक्क आहे. मला आशा आहे की तुला शहाणपण सुचेल आणि तू मदतीला तयार होशील.

चंदू, तू हे कागद वाचत असताना माझं तुझ्यावर लक्ष आहे. माझ्या योजनेला तुम्ही संमती असेल तर मोठ्याने 'हो' म्हण. नीट विचार करून काय ते ठरव."

कागदावरचा मजकूर अचानकपणे संपला होता. हातात ते कागद घेऊन चंदू कितीतरी सेकंद होता तसाच उभा राहिला. मनात विचारचक्र फिरत होतं आणि त्यातले बहुतेक विचार त्याच्या हातून झालेल्या चुकांबद्दलच होते. दोनदा, नव्हे तीनदा, त्याला या प्रकाराचा गौप्यस्फोट करण्याची संधी मिळाली होती... त्याने ती कां घेतली नाही ? तो कां गप्प बसला ? तो गप्प बसला नसता तर हे प्रकरण मुळातच उखडलं गेलं असतं. आता काय करायचं ? या असल्या घाणेरड्या गोष्टींना तर तो कधीच तयार झाला नसता; पण केवळ निष्क्रीय राहून त्याच्यावरची जबाबदारी संपत नव्हती; या राक्षसी प्रकाराचा जो उद्भव झाला होता त्याला बव्हंशी तोच जबाबदार होता; तेव्हा या राक्षसी, हिकमती, अनसर्गिक अस्तित्वाचा नाश करणं हीही त्याचीच जबाबदारी होती. त्याला एकट्याला जमलं नाही तर कोणाची तरी मदत घेऊन...

फळीच्या एका अंगाला टक् टक् आवाज झाला. कोणीतरी बोटं आपटल्यासारखा. चंदूने दचकून आवाजाच्या दिशेने पाहिलं. फळीच्या कडेला तो पंजा चिकटून बसला होता... आणि आता, प्रत्यक्ष त्याच्या देखत, खालची दोन निळसरकाळी बोटं फळीवर आपटली.. अधीर झाल्यासारखी. चंदूच्या निर्णयासाठी तो अगदी अधीर झालेला दिसत होता. विचारांच्या गडबडीत चंदूला या प्रकारातला खरा भयानकपणा जाणवलाच नाही—निदान त्यावेळी तरी नाही. त्याने कागदाची झटपट घडी केली, खिशात कोंबली आणि "विचार करून सांगतो–" असं म्हणत तो खोलीबाहेर सटकला. आत रिकाम्या खोलीत, त्या पंज्याची टकटक चाललीच होती. दहाबारा पावलं चालल्यावर मग चंदूला आपण काय पाहिलं ते आठवलं शरीरापासून काटलेला, सडलेल्या मांसाचा एक पंजा त्याच्या खोलीत होता, खुडबुडत होता... त्या पंज्यात वावरणारी प्रेरणा त्याच्याशी संपर्क साधू पहात होती.... चंदूच्या सर्व शरीराला घाम फुटला; हातपाय लटलटा कापायला लागले; एका भिंतीच्या आधाराने तो कसावसा उभा राहिला.

## [६]

स्थळ आणि काळ यांचा चंदूला काहीवेळ तरी पार विसर पडला होता. येणारे–जाणारे लोक त्याच्याकड जरा आश्चर्याने

अनुक्रमणिका






पहात होते याचीही त्याला जाणीव नव्हती. त्याच्यावर गुदरलेला प्रसंग रोजच्या जगाचा विसर पाडायला लावणाराच होता. वाऱ्याच्या वावटळीवरोबर कागदाचा कपटा भिरभिरत खूप उंच उडावा तसं त्याचं मन दिशाहीन झालं होतं. पण काही वेळाने विस्मयाचा आणि भीतीचा हा आवेग ओसरला आणि दमछाक झालेलं मन सावकाश सावकाश तरंगत खाली व्यवहाराच्या पातळीवर आलं. मग चंदूला घड्याळात पहायचं सुचलं. रात्रीचे साडे आठ वाजले होते. गोपाळ यायची वेळ झाली होती. त्याची मदत घ्यायला हवी होती. पण म्हणजे त्याला आतापर्यंतची सर्व हकीगत सांगणं आलं. कितीही उलटसुलट विचार केला तरी चंदूला ते टाळण्याचा काही मार्ग सुचेना. आणि हे सगळं सांगायचं ते खोलीत नाही – बाहेर कोठेतरी बसून सांगायला हवं – कारण खोलीत तो पंजा होता आणि त्याची श्रवणशक्ती मोठी तिखट होती. गोपाळची वाट इथेच पहायचं चंदूने ठरवलं. नाहीतरी आता रात्रीच्या वेळी एकट्याने त्या खोलीत जायला तो जरासा कचरतच होता. अर्थात त्याला तशी शारीरिक भीती वाटत नव्हती – निदान जागतेपणी तरी खास नाही. तो पंजा बोलून चालून एका मोठ्या उंदराएवढा असेल – चंदूला प्रत्यक्ष शारीरिक इजा (चंदू जर सावध असेल तर) अशी कितीशी करू शकणार होता? पण त्याच्याशी झटापट करण्याची कल्पनाच चंदूला कशीशीच वाटत होती त्याच्या मनासमोर चित्र आले ते तो स्वतः टेबलापाशी बसला आहे आणि मागच्या बाजूने, अंधारातून, तो पंजा हळूहळू पुढे सरकत सरकत, खुर्चीच्या पायावरून, मागच्या पाठीवरून त्याच्या मानेपाशी आल्याचं होतं... मग एक लहानशी उडी आणि एकदम गळ्याभोवती त्या निळ्याकाळ्या बोटांचा विळखा ...अर्थात चंदू हातांनी ती बोटं उपसून काढून पंजा दूर फेकून देऊ शकला असता. पण ती सडकीनासकी बोटं हातात घ्यायची या केवळ कल्पनेनेच त्याच्या अंगावर शहाऱ्यामागून शहारे येत होते... नाही! इथेच गोपाळची वाट पहावी, त्याला सगळं काही सांगावं आणि मग तो काय उपाय सुचवतो हे पहावं हाच उत्तम मार्ग होता. आणि मनात आणखीही एक विचार होता. खोलीत काय आहे याची गोपाळला कल्पना देणे हेही चंदूचं कर्तव्यच होतं. स्वतःच्या मूर्ख-पणानेच त्याने हे संकट आपल्यावर ओढवून घेतलं होतं–त्याची झळ गोपाळला लागायला नको ..तो आपला नेहमीसारखा खोलीत जायचा. आणि आणि .नकोच ते विचार.! गोपाळला पाहून आपल्याला कधी काळी इतका आनंद होईल असं चंदूला कधीही वाटलं नव्हतं. गोपाळ जवळून जात असतानाच चंदूने त्याला एकदम हाक मारली; गोपाळ नैसर्गिकपणेच जरासा दचकला आणि मग अंधारात, एका बाजूला उभ्या असलेल्या चंदूकडे आश्चर्याने पहात म्हणाला, "चंदू? इथे काय करतो आहेस रे?" चंदू पुढे येऊन त्याचा हात हातात घेत म्हणाला, "चल सांगतो नको खोलीत नको ..बाहेरच बोलू कोठे तरी गोपाळ क्षणभरच अडखळला आणि मग चंदूबरोबर निघाला.

येथपासून गोपाळचाही या प्रसंगात प्रवेश झाला तेव्हा त्याचं वर्णन अस्थानी होणार नाही. गोपाळ उण्यापुऱ्या उंचीचा, व्यायामाने आणि खेळाने कमावलेल्या शरीराचा होता. सुदृढ शरीराचा त्याचा हव्यास सर्व मित्रांनाही माहीत होता. दणकट शरीर आणि कुशाग्र बुद्धी यांचं जरा वाकडंच असतं, तेव्हा गोपाळचा रशियन भाषेचा अभ्यास ही त्याच्या मित्रात एक कायम थट्टेची गोष्ट होती. एकूण गोपाळ डोक्याला फारसा त्रास न देणारा, आयुष्यातल्या भल्याबुऱ्या प्रसंगाना स्थितप्रज्ञतेने तोंड देणारा इसम होता. आणि त्यामुळेच त्याचं आयुष्य शांत आणि समाधानी होतं. आता तो चंदूबरोबर चालत होता आणि चंदू सांगत असलेली सर्व हकीकत निमूटपणे ऐकत होता. मधेच एकदोनदा त्याने जरा आश्चर्याने चंदूकडे पाहिलं, पण तो काही बोलला नाही. मोठ्या रस्त्यावर एकदोन चकरा झाल्यावर त्यांना चालायचा कंटाळा आला आणि त्यांनी कोपऱ्यावरचं एक हॉटेल गाठलं; तिथे चंदूने आपली हकीकत पुरी केली. अगदी आताच्या क्षणापर्यंत आणि मग त्याला आपल्या टेबलावर सापडलेली दोन्ही पत्रं त्याने गोपाळपुढे ठेवली.

गोपाळने दोन्ही पत्रं सावकाश वाचली आणि मग त्यांच्या घड्या करून त्या चंदूपुढे सारल्या. बराच वेळ चंदूकडे निरखून पाहून तो शेवटी म्हणाला,

"चंदू ..हे सगळं जरा चमत्कारिक वाटतं, नाही?

"गोपाळ, सरळ बोललास तरी चालेल – मला कल्पनाच होती की तुझा या गोष्टीवर विश्वास बसणार नाही – आणि मी तुला दोष देत नाही – माझाही बसला नसता – जर मी माझ्या डोळ्यांनी तो पंजा पाहिला नसता तर!

"तुला असं नाही वाटत की काहीतरी चूक




**चंद्रावर पहिले (?) पाऊल**

"भ्रम, भास वगैरे? सॉरी, तसं काही नाही—आता आपण खोलीवर जाणारच आहोत ... तेव्हा तुला प्रत्यक्षच पहायला मिळेल!"

गोपाळच्या तोंडून एक लहानशी शीळ निघाली, पण चंदूच्या शब्दांवर त्याचा कितपत विश्वास बसला हे कळणं कठीण होतं. "गोपाळ," चंदू म्हणाला, "मला स्वतःला आज सकाळपर्यंत याची कशाचीच कल्पना नव्हती ... तू एकदम खोलीत गेलास आणि तुला काही ... काही चमत्कारिक दिसलं तर धक्का बसायला नको यासाठी तुला आधी हे सारं सांगितलं. आणि दुसरीही एक गोष्ट आहे. आता तो पंजा तू प्रत्यक्ष पहाशीलच .. मी त्याच्या त्या घाणेरड्या कारस्थानात कदापीही भाग घेणार नाही उलट त्या पंज्याचा नाश करायचा मी निश्चय केला आहे ... त्यात मला तुझी मदत हवी आहे.

गोपाळ जरा सावरून बसला आणि मान हलवत म्हणाला, "आधी आपण हा तुझा पंजा तर पाहू — मग बघू काय करायचं ते .."

एक उसासा सोडून चंदू उभा राहिला. "ठीक आहे. पण एक लक्षात ठेव. त्या खोलीत मोठ्याने काहीही बोलू नकोस — त्याला ऐकू येतं. आणि काही खुणाही करू नकोस — त्याला सगळं काही दिसतं .. आता हे कसं होतं हे मात्र मला विचारू नकोस — कारण मला ते माहिती नाही —"

ते खोलीवर आले तेव्हा रात्रीचे साडेनऊ वाजले होते. कुलूप उघडायच्या आधी चंदूने तोंडावर बोट ठेऊन गोपाळला गप्प रहायची खूण केली; दार अजिबात आवाज न करता उघडलं आणि अगदी सावकाश आत पाय टाकला. दाराच्या आतच दोन पावलांवर उभा राहून तो खोलीचा कानोसा घेत होता. पण खोलीत संपूर्ण शांतता होती. चंदू तसाच दिव्याच्या बटणाच्या रोखाने हलकेच गेला, बटणावर हात ठेवला आणि खट्दिशी दिवा लावला. खोली एकदम प्रखर प्रकाशाने भरली. आणि त्याच क्षणी टेबलापाशी काहीतरी खुडबुड झाली. आवाजाचा अंदाज घेऊन तिकडे पहायला त्यांना पाचसात सेकंद तरी लागले. आणि मग चंदू एकदम ओरडला, "ते बघ!" त्याचं बोट वर दाखवत होतं. भिंतीला ठोकलेल्या विजेच्या वायरिंगवरून काहीतरी निळंकाळं झपाट्याने सरकत होतं. ती चाल चमत्कारिक होती, ओळखीची नव्हती, वर्णनच करता येण्यासारखी नव्हती. पहाता पहाता ते फळीपाशी पोचलं आणि मग फळीवरच्या सामानामागे दिसेनासं झालं. गोपाळचा चेहरा क्षणभर पांढरा पडला होता, पण सावकाश सावकाश त्यावर रंग आला.

"छॅ! काय घाबरवतोस रे चंदू!" तो हसत म्हणाला."काहीतरी आहे हे नक्की ... पण एखादा उंदीर किंवा असलंच एखादं जनावर असेल ... त्याला का तू इतका भीत आहेस? कमाल आहे बुवा तुझी!

"आता तुला ते दिसलं नाही? तू पाहीलं नाहीस?"

"काय? एक काहीतरी लहानसा प्राणी दिसला — दुसरं काही नाही! सॉरी अं — जरा रिलॅक्स हो रे, चंदू!"

चंदू काहीच बोलला नाही. बोलण्यासारखं काही राहीलंच नव्हतं. आणखी सबळ पुरावा दाखवल्याशिवाय गोपाळचा विश्वास बसणार नव्हता. तोपर्यंत हा बोजा त्याला एकट्यालाच वहावा लागणार होता.

दोघं आपापल्या कॉटवर झोपले होते. खोलीत एक अगदी मंद रात-दिवा जळत होता. मोठा दिवा मालवताना चंदूचा हात क्षणमात्र अडखळला होता; पण दिवा तसाच ठेवला तर गोपाळचे प्रश्न सुरू झाले असते आणि केवळ शब्दांनी त्याची खात्री पटणार नव्हती. चंदूने दिवा मालवला आणि तो कॉटवर जाऊन पडला. झोप येण्याची आशाच नव्हती. खोलीत तो पंजा वावरत असताना डोळे मिटून घ्यायची त्याची हिम्मतच होत नव्हती. आसपासच्या बारीकसारीक सर्व आवाजांकडे त्याचं लक्ष होतं आणि प्रत्येक आवाजाची तो मनातल्या मनात शहानिशा करीत होता.

आदली रात्र प्रवासात गेली होती — आता खरं म्हणजे त्याला झोपेची अतिशय जरूरी होती. डोळे अगदी तारवटल्यासारखे झाले होते. पण मनावर ताण इतका विलक्षण होता की एक क्षणभर जरी डोळे मिटले तरी ते तो लागलीच दचकून उघडत होता. खोलीत कोठेतरी घड्याळ टकटकत होते. त्या एका आवाजाखेरीज सर्वत्र शांतता होती. निजल्या निजल्या चंदूचे डोळे सर्व खोलीवरून फिरत होते. तो पंजा आता कोठे असेल? एखाद्या जुन्या ट्रंकेमागे किंवा खोक्यामागे लपून बसला असेल? का फळीच्या कडेवरून हळूच खाली खोलीत डोकावून पहात असेल?

एक क्षणभर त्याची जिज्ञासा जागृत झाली. तो पंजा ऐकू शकत होता, पाहूही शकत होता .. पण रूढ अर्थाने त्याला कान नव्हते, डोळेही नव्हते ... मग या क्रिया होत तरी कशा होत्या? त्या पंजाभोवतीच एखाद्या अतींद्रीय शक्तीचं आवरण होतं का! तसं असलं तरी त्याच्या शक्तीला काही मर्यादा होत्या. त्याला प्रवास करायचा झाला तर स्वतःच्या बोटांनी किंवा इतर कोणत्या तरी साधनाने करावा लागत होता; दारं खिडक्या लावली तर त्यातून त्याला बाहेर जाता येत नव्हतं .. त्याच्या अस्तित्वालाच अनैसर्गिकपणा सोडला तर त्याची बाकीची शक्ती त्याच्या आकाराने आणि शारीरिक गुणधर्मांने मर्यादित झाली होती. चंदूने आपले विचार आणखी स्पष्ट केले ... त्या पंजात इतर कोणत्याही अनैसर्गिक शक्ती नव्हत्या; त्याला अदृश्य होता येत नव्हतं, लोकांची मनं वाचता येत नव्हती, त्याला

त्याचे विचार एकाएकी थांबले. शरीराची सर्व हालचाल गोठली. त्याच्या विचारांच्या तंद्रीत खोलीतल्या एका लहानश्या आवाजाकडे त्याचं लक्ष गेलं नव्हतं . पुन्हा एकदा तो आवाज आला. चोरून केल्यासारखा. तो कशाचा होता हे चंदूला पहिल्या क्षणातच समजलं होतं. आपली लपायची जागा सोडून तो पंजा बाहेर आला होता. फक्त आता कशासाठी बाहेर पडला होता हे पहायचं होतं. चंदूची नजर पुन्हा एकदा खोलीवरून फिरली. आता आवाज

अनुक्रमणिका

# खात्रीचा ताईत



मी तुम्हाला एक ताईत देतो. जेव्हा जेव्हां शंका निर्माण होईल किंवा तुमचा स्वार्थ अतिशय बळावेल तेव्हां तेव्हां खालील उपाय योजा. तुम्ही पाहिलेल्या अत्यंत गरीब व अत्यंत लाचार माणसाचा चेहरा आठवा, आणि आपल्या मनालाच विचारा की, तुमचा बेत, त्याच्या काही तरी उपयोगी पडेल काय? आपल्या स्वतःच्या जीवनावर व नशिबावर तावा ठेवण्याच्या बाबतीत तो बेत त्याला साह्यभूत ठरेल काय? दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे, आपल्या देशातील लक्षावधी भुकेल्या लोकांना आणि आध्यात्मिक दृष्टया भुकेल्या लोकांना सुद्धा तो बेत स्वराज्य किंवा आत्मनियमनाच्या मार्गाकडे घेऊन जाईल काय? तेव्हां तुमच्या शंका व तुमची स्वार्थ-वृत्ती नाहीशी होत असल्याचे तुम्हाला दिसेल?

महात्मा गांधी





MAHATMA GANDHI
BIRTH CENTENARY
OCT.2,1968 TO
FEB.22,1970

महात्मा गांधी
जन्म शताब्दी
अक्तूबर 2,1968 से
फरवरी 22,1970








थांबला होता, पण तो एवढ्यातच पुन्हा येणार हे त्याला माहीत होतं. तो पहा ! खिडकीच्या वरच्या बाजूने आला. चंदूला एकदम वाटलं — ताडकन् उठावं आणि दिवा लावावा . . . पण मोठ्या प्रयासाने त्याने स्वतःला सावरलं. दमाने घ्यायला हवं. घाई करून उपयोगी नाही. सावकाश, सावकाश . . .

खिडकीवरचा व्हेंटीलेटर आत उघडलेला होता. त्या व्हेंटीलेटर-वर चंदूचं सर्व लक्ष एकवटलं होतं. पुन्हा एकदा बारीकसा आवाज आला. काहीतरी पुढे सरपटल्यासारखा. चंदूच्या प्रतीक्षेची तीव्रता इतकी वाढली की त्याला वाटलं आता छातीत कोंडलेला श्वास स्फोट होऊन बाहेर पडणार आहे. पुन्हा एक बारीक आवाज आला, आणि व्हेंटिलेटरच्या कडेपाशी त्याला काहीतरी दिसलं. पंजाचं ते एक बोट होतं. कडेवरून वळून खालची बाजू चाचपून पहात होतं. एखाद्या आंधळ्या अळीसारखे. त्यामागोमाग दुसरं बोट आलं, मग सगळा पंजाच वरून खाली आला. दिव्याच्या अंधुक प्रकाशात तो जवळजवळ काळाच दिसत होता. व्हेंटीलेटरच्या कडेवरून सरकत सरकत तो खिडकीपाशी आला, तेथून विजेच्या वायरिंगच्या बटण-वर आला आणि मग त्यावरून अगदी सावकाश सरकू लागला. अजिबात आवाज न करता तो चंदूच्या कॉटच्या रोखाने येत होता.



तो पुढे काय करणार याची चंदूला कल्पना आली होती. वाय-रिंगची एक लाईन भिंतीवरून चंदूच्या कॉटच्या उशापर्यंत आली होती. त्या मार्गावरून सरळ तिथपर्यंत यायचा त्याचा विचार ( ! ) असावा. कितीही वेळा पाहिलं तरी त्या घाणेरड्या प्रकाराची शिसारी कमी होत नव्हती. एखाद्या खेकड्यासारखी त्याची चाल फेंगडी आणि बेढौल होती. त्यामागे दुष्ट हेतू नसता तर ती हास्यास्पदच वाटली असती . . . . पण यामागे किती नीच, किती दुष्ट हेतू होता !

आपल्याला काय करायला हवं हे चंदूला समजलं होतं. तो पंजा हातांनी पकडायला हवा होता ! स्पर्शाची कितीही किळस वाटली तरी हे करायलाच हवं होतं. पुन्हा संधी मिळेल का नाही सांगता येत नव्हतं. तेव्हा प्रयत्न एकदाच पण अचूक व्हायला हवा होता. भीतीने किंवा घृणेने शरीर यावेळी कमजोर होऊन देता उप-योगी नव्हतं. शरीर थरथर कापत असूनसुद्धा चंदूने मन तयार केलं. योग्य क्षणाची वाट पहात तो ताठ शरीराने निजून राहिला.

वायरिंगवरून सरकत सरकत पंजा त्याच्या कॉटजवळच्या भिंतीवर आला. खाली उतरायच्या आधी तो वराच वेळ एका जागी निश्चल राहिला. त्याची पुढची दोन बोटं हवेत थरथरत होती. जणु काही ती आसपासच्या रात्रीचा अंदाजच घेत होती . . . आणि मग तो सावकाश खाली सरकायला लागला.

आपल्या हातांच्या आवाक्यात तो आला आहे अशी खात्री होताच चंदूने एक मोठी उसळी घेऊन झेप टाकली आणि दोन्ही हातानी तो पंजा घट्ट धरला. त्याच क्षणी तो मोठ्याने ओरडला "गोपाळ ! गोपाळ ! जागा हो ! दिवा लाव !" दोन्ही हातात घट्ट धरलेला पंजा सारखी वळवळ वळवळ करीत होता. हाताला त्याचा स्पर्श कोरडा, अगदी थंड लागत होता. क्षणाक्षणाला चंदूच्या सर्व शरीरावर शहारे उठत होते. मानेवर व गळ्याला डवडवून घाम आला होता. तो जवळजवळ हुंदका देत पुन्हा ओरडला, "गोपाळ ! अरे जागा हो ! दिवा लाव ! मला फार वेळ हे धरवायचं नाही रे ! उठ !"

चंदूने डोळे घट्ट मिटून घेतले होते. मागे खोलीत काहीतरी हालचाल झाली, गोपाळ अर्धवट काहीतरी बोलला आणि खोलीत लख्ख प्रकाश झाला.

"चंदू ! काय रे ! काय करतो आहेस रे ?"

चंदू काहीच बोलू शकत नव्हता. त्याने नुसतीच मान हलवली. गोपाळ मागून त्याच्या जवळ आला आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला,

"अरे, काय झालंय् ते सांगशील तरी ? असं काय करतो आहेस ?"

काही न बोलता चंदू तसाच बसल्या बसल्या वळला आणि त्याने आपले दोन्ही हात गोपाळपुढे केले. दोन हातात धरलेला तो पंजा अजून वळवळत होता.

"हे काय ? हा काय . . ." गोपाळ एकदम थांबला. **"बाप रे ! बाप रे !"**




"गोपाळ..गोपाळ...धर त्याला .मला आता धरवत नाही "

"पण–पण " मग जरा वेळाने "हाच का तुझा तो पंजा ??"

"हो..हो..आता फार वेळ धीर निघायचा नाही मला.."

"असं नको..असं नको..जरा थांब..एखादी पेटी..खोकं पाहतो...आहे, आहे, एक मिनीट थांब...ही फळी आहे.. एखादा खिळा आणतो आणि त्याला फळीवर ठोकूनच टाकतो..." गोपाळचे शब्द चंदू अर्धवटच ऐकत होता; आपल्या आसपास एखादं काळं धुकं पसरल्यासारखं त्याला वाटत होतं; विचार करणं-सुद्धा कठीण जात होतं – मग बोलणं तर दूरच राहिलं ...हातात धरलेलं काय वाटेल ते झालं तरी सोडायचं नाही याच आपल्या निर्धाराचा तो मनाशी पुन्हा पुन्हा उच्चार करीत होता...हात शक्य तितके लांब ठेऊन डोळे घट्ट मिटून तो होता तसाच बसला होता. गोपाळची खोलीत शोधाशोध, धावपळ आणि वडवड चाललीच होती

"हं–ये आता खाली–" गोपाळ शेवटी म्हणाला, आणि मग मात्र चंदूला डोळे उघडावेच लागले. खोली आपल्या डोळ्यासमोर हेलकावे खात आहे असं त्याला क्षणभर वाटलं. मग तो तसाच पुढे सरकला. खोलीच्या मध्यभागी गोपाळ बसला होता. त्याच्यासमोर एक लाकडाचा तुकडा होता आणि त्याच्या हातात एक हातोडा होता. "ये खाली..मग पाहू त्याच्याकडे–" गोपाळ हातोडा हलवत म्हणाला. चंदू कॉटवरून खाली आला आणि गोपाळसमोर उकिडवा बसून त्याने हात पुढे केले. पंजाची बोटं एका हातात आणि बुडखा दुसऱ्या हातात होता. आताच्या क्षणापुरता पंजा जरा मलूल झाल्या-सारखा निश्चेष्ट पडला होता. चंदू आता प्रथमच त्याच्याकडे जवळून असा पहात होता. गोपाळने हाताने खूण करून चंदूला तो पंजा फळीवर आडवा धरायला सांगितलं आणि चंदूने तसा धरताच गोपाळने डाव्या हातातला मोठा तारेचा खिळा पंज्याच्या मध्यभागी टेकवला आणि हातोडा बरोबर वर धरून खिळ्यावर जोराचा घाव घातला.

प्रत्यक्ष घाव बसायच्या क्षणी चंदूने डोळे घट्ट मिटून घेतले होते; मग त्याने ते सावकाश उघडून खाली पाहिलं आणि परत ते घट्ट मिटून घ्यावेसे वाटले. हाताच्या तळव्यातून खिळा लाकडात गेला होता आणि पंजा लाकडावर एखाद्या कीटकासारखा अडकला होता; आणि एखाद्या टांचलेल्या कीटकासारखीच तो तडफड तडफड करीत होता...बोटांच्या आकड्या वळत होत्या आणि मग बोटं परत ताठ होत होती...खरोखर ते नुसतं पाहूनच चंदूला गरगरायला लागलं...हातात डोकं गच्च धरून तो जरा मागे सरकून बसला.

"चंदू, आता इकडे पाहिलंस तरी चालेल गोपाळचा आवाज आला.इतक्या वेळाच्या तडफडीनंतर तो पंजा आता थकलेला, शक्तीहीन वाटत होता आणि आता बोटांची कोणतीही हालचाल न होता ती मलूलपणे लाकडावर पडून होती. एका हाताने गोपाळने त्या पंजाला स्पर्श केला, एक बोट उचलून पाहिलं... पण आता त्यात अजिवात चेतना नसावीसे दिसत होते. "चंदू, आता मला माफ कर..मघांशी तू सांगत होतास तेव्हा माझा विश्वास बसला नव्हता.. आता मी माझी सर्व टीका मागे घेतो..." बोलता बोलता तो त्या





अनुक्रमणिका

पंजाचं बारकाईने निरीक्षण करीत होता. "चंदू, एवढं आरपार भोक पाडलं तरी त्यातून रक्त मुळीच आलं नाही, पाहिलंस का?" खरं म्हणजे चंदूला त्या पंज्याच्या बाबतीत काहीही पहायचं नव्हतं, काहीही ऐकायचं नव्हतं . . . पण शेवटी मनात एक अघोरी कुतुहल असतंच . . जरा अनिच्छेनेच तो पुढे झाला आणि पाहू लागला. . . पंज्याच्या त्वचेचा वर्ण आता मातट-निळसर-काळा वाटत होता; मनगटाजवळची कड वाळलेल्या रक्ताने करवडलेली होती; वरची त्वचा आता अगदी सैल पडली होती . . पण सर्वात वाईट आणि किळसवाणी गोष्ट म्हणजे बोटांची नखं चांगलीच वाढली होती . . . त्या नखांनी पंजा एकदम हिंस्र वाटत होता

गोपाळ मघाच तेथून उठून गेला होता — त्याचं खोलीत काय चाललं होतं ते आता चंदूला दिसलं. त्याने एक जुना पायजमा फाडून त्याच्या चिंध्या केल्या होत्या आणि त्यांचे तो आता बोळे करीत होता. जेव्हा त्याने रॉकेलची बाटली खाली घेतली तेव्हा चंदूच्या डोक्यात प्रकाश पडला. गोपाळने भावनेच्या आहारी न जाता सरळ उपाय शोधून काढला होता. या पंज्यावर चिंध्या व रॉकेल टाकून तो त्याला जाळून टाकणार होता! क्षणभर चंदूला कसंसच वाटलं . . . पण शेवटी त्यालाही ते स्वीकारावंच लागलं.

चिंधीचा रॉकेलमधे भिजलेला आणि धगधगता जळता गोळा पंज्यावर प्रत्यक्ष पडेपर्यंत बोटं तशीच मलूल होती . . आणि मग मात्र त्यांची विलक्षण धडपड सुरू झाली . . इतकी की त्यांच्या जोराने प्रत्यक्ष लाकडाचा तो तुकडाही गदगदा हलायला लागला. त्या नाशाची जबाबदारी गोपाळने स्वतःवर घेतलेली दिसत होती. जवळ चिंध्यांचा एक जुडगा घेऊनच तो बसला होता आणि मधून मधून एक बोळा समोरच्या धगधगत्या जाळात टाकत होता.

एखाद्याला वाटेल की इतकं झाल्यावर तरी त्या पंज्याची राख-रांख झाली असेल — पण नाही! त्याच्यात जी कोणती शक्ती वावरत होती तिची आयुष्यावरची पकड विलक्षण चिवट होती. जाळाच्या तावडीत लाकूड दुभंगलं होतं, त्यातला खिळा ढिला झाला होता. बोटांच्या हालचालीने तो पारच निघाला असेल . . . ते कसं का असेना, मधेच एकदा त्या धडधडत्या ज्वाळातून एक काळपट, धुरकटलेला, करपलेल्या त्वचेचा, होरपळलेल्या बोटांचा काळा पंजा एका बाजूनं हळूच बाहेर पडला आणि त्या दोघांचं लक्ष नसतं तर खुरडत खुरडत कॉटखालच्या अंधारात तो नाहीसाही झाला असता—पण—

"गोपाळ! गोपाळ! ते बघ! बाप रे!" चंदू ओरडला; पण गोपाळ तर त्याआधीच उठला होता. तो सरपटत जाणारा पंजा त्याने एका हाताने सहज पकडला; हातात तो भाजका पंजा धरून त्याने काही वेळ विचार केला आणि मग तो म्हणाला, "चंदू! तुझी दाढीची डबी दे — आतापुरतं त्यात घालून ठेवू या . . . . मग बघू काय करायचं ते " चंदू उठला, कपाटाकडे गेला. हालचाली स्वप्नात असल्यासारख्या होत होत्या. हातापायांच्या हालचालीवर ताबा नव्हता. त्याने दाढीची डबी काढली, टेबलावर त्यातलं सगळं सामान ओतलं आणि ती डबी गोपाळकडे नेली. गोपाळने डावा हात सोडवून घेतला, उजव्या हाताने पंजा डबीत कोंबला, झाकण लावून टाकलं आणि वरून एक दोरी बांधली.

"विनाकारण एवढी जाळपोळ केली —" खालच्या रसरशीत निखाऱ्यांकडे पहात गोपाळ म्हणाला. "आता हे सगळं आवरून टाकायला हवं —"

चंदूला त्या चमत्कारिक पत्रातलं एक वाक्य आठवत होतं . . . "त्यानाही माझा नाश करता आला नाही—मला त्यांनी नुसतं कोंडून घातलं होतं

## [७]

चंदू खोलीतला पसारा आवरत होता तोवर गोपाळने चहा बनवला. ते चहा घ्यायला बसले तेव्हा खोली परत पूर्ववत् व्यवस्थित झाली होती. टेबलावरची एक लांबट पत्र्याची डबी तेवढी सारखं लक्ष वेधून घेत होती. कारण तिच्यातून खुडबुडण्याचा आवाज ऐकू येत होता. एखादा लहानसा प्राणी आत डांबून ठेवल्यासारखा.

"चंदू, मला आता कळलं काय करायला हवं ते —" गोपाळ चहाचा कप खाली ठेवत म्हणाला. "मी उद्या दोन अडीच शेर सीमेंट आणतो; आपण हा पंजा त्यात चिणून टाकू आणि नदीत सोडून देवू . . "

त्याच्या तोंडून हे शब्द निघताच डबीतला खडखडाट एकदम इतका वाढला की त्याला गप्पच बसावं लागलं. जरा वेळाने गोपाळ म्हणाला, "करू दे खडबड हवी तेवढी! आता म्हणावं विसावं शतक आहे! लोक काही आता पूर्वीसारखे भोळसट व अंधश्रद्धाळू राहिलेले नाहीत . . . शेवटी त्याची शक्ती त्याच्या आकारापलिकडे जात नाही एवढं तर खरं ना?"

चंदूला ही गोष्ट त्याआधीच उमगली होती.

त्या रात्री चंदूला एका सेकंदाचीही झोप लागली नाही. ती डबी सारखी खडबड करीत होती. त्याला माहीत होतं की तो पंजा त्यांच्याशी काहीतरी सौदा करण्याची धडपड करीत होता. पण चंदू त्या डबीच्या जवळ फिरकलाही नाही. मघाशी पंजा हातात घेतानाच त्याला त्याच्या शक्तीची एक चुणूक जाणवली होती. बेटर गोपाळलाच काय करायचं ते करू दे.

गोपाळचा शहाणपणा म्हणजे उरलेल्या रात्रीच्या वेळात त्याने या अजब प्रकारावर एक शब्दही काढला नाही. त्याला झोप आली का नाही हे चंदूला समजायला मार्ग नव्हता, पण रात्रभर तो निपचित पडून राहिला होता.

या भीषण नाटकाचा अखेरचा अंक सकाळी उरकला आणि त्यावर पडदा पडला. दिलेल्या शब्दाप्रमाणे गोपाळ खरोखरच पहिला चहा होताच बाहेर पडला आणि सिमेंट घेऊन आला. त्याच बरोबर त्याने बरीचशी जाड तारही आणली होती. तारेची त्याने एक जाळी केली, डबीतला (अजूनही वळवळणारा) पंजा काढून तारेच्या जाळीला बांधला आणि मग सिमेंटचा लगदा तयार करून त्याच्या एका सपाट थरावर ती जाळी ठेवली आणि त्याच्यावर परत एक

जाड थर पसरला. सुरुवातीस तो सर्व चौकोन आतून हादरत होता, पण काही वेळाने हे हादरे वंद झाले.

आतली पांची वोटं ताराना वांधली नसती तर काय झाल असतं हे चंदूला सांगता येईना. मोरीच्या कट्टयावर तो सीमेंटचा व्लॉक ठेवून गोपाळ सकाळसंध्याकाळ त्यावर पाणी सोडत होता. सीमेंट सॅटीग-क्यूअरींग निर्दोष होण्यासाठी त्याने सर्व काळजी घेतली. आणि मग तो व्लॉक पुरेसा वाळला आहे अशी त्याची खात्री झाल्यावर एका संध्याकाळी तो त्याने आपल्यावरोवर वाहेर नेला. परत आला तेव्हा गोपाळचे हात रिकामे होते.

चंदूने हजारदा विचारूनही गोपाळने त्याला ती जागा सांगितली नाही.

"चंदू, तो अगदी खोल पाण्याच्या तळाशी आता विश्रांती घेतोय् एवढी खात्री वाळग. तो अविनाशी आहे असा त्याचा दावा आहे– असेलही तसं – पण आताच्या या सापळ्यातून सुटायला त्याला वराच कालावधी लागणार अहे – तोपर्यंत आपण तरी कोठे जगणार आहोत ?"

चंदू व गोपाळ यांची या एकूण प्रकारावर वरीच चर्चा झाली, पण या वावतीत दोघांचं अज्ञान सारखंच होतं. नाही म्हणायला काही दिवस त्यांच्या मित्रवर्तुळात अगदी चवीने सांगण्यासारखी एक चमत्कारिक सत्यकथा त्यांच्या हाती लागली होती....पण त्याचीही गोडी फार दिवस टिकली नाही आणि तो विषय संभाषणातून गेला.

आवासाहेव ऑपरेशनमधून ठीक झाले, पण एकंदर शारीरिक दुर्बलतेचा त्यांच्या मनावर फारच परिणाम झाला होता आणि त्यांची जगण्याची इच्छाच मालवल्यासारखी झाली होती. कारण ऑपरेशन-नंतर तीन-साडेतीन महिन्यातच एका सकाळी त्यांचे प्राणोत्क्रमण झाले. अंत्यसंस्काराला अर्थात चंदू हजर होता. त्यांचे हात छातीवर ठेवताना त्याला त्यांचा तो वांडा उजवा हात दिसला आणि ती सर्व चमत्कारिक प्रसंगांची मालिका त्याच्या नजरेसमोर स्पष्टपणे उभी राहिली. या मृत शरीराचा एक हात मात्र मृत नाही, त्या अर्धसजीव-अर्धमृत अशा निरुद्ध अवस्थेत तो आता कोणत्या तरी जलाशयाच्या तळाशी, गाळात अडकला होता

दिवसाचे विचार रात्री स्वप्नरूपात येतात असं म्हणतात.

चंदूला त्या रात्री एक फार वाईट स्वप्न पडलं... रात्रीची वेळ.. अंधार..शांतता जवळपास पाण्याचा गारवा आणि लाटांचा अगदी अस्पष्ट आवाज..तार्‍यांच्या अंधुक प्रकाशात दिस-णारी पाण्याची एक अस्पष्ट कड...त्या रेषेचा सरळपणा मोडतो.. पाणी खळवळत असतं..पाण्यातून काहीतरी मोठ्या कष्टाने, इंचा-इंचाने वाहेर येत असतं ..त्याचा आकार अस्पष्ट आहे त्याच्या रेषा धूसर आहेत पण आकार पहाताच मनात एक संशय येतो ..ते चांदण्याच्या प्रकाशातून जवळ जवळ येतं मग दिसतं की तो एक पंजा आहे... शेवाळात, चिखलात वरवटलेला, पाण्याने कुजून गेलेल्या मांसाचा..तो आपल्या रोखाने येत आहे. पुढची दोन वोटं..मग अंगठा मग मागची दोन वोटं अशी फेंगडी चाल...आसपासची थंडी वाढत आहे .हातापायाना सुन्नपणा येत आहे...

चंदू एकदम दचकून जागा झाला. शरीर घामाने ओलंचिंव झालं होतं. हातापायांची थरथर अजून चालू होती. आपण आपल्याच खोलीत आहोत, मघाचं ते सारं स्वप्नच होतं याची खात्री होताच त्याने एक खूप मोठा उसासा सोडला आणि पुन्हा कुशीवर वळून तो झोपी गेला..पण ही रात्र अपवादात्मक नव्हती; कोणत्याही कारणाने त्याचं मन उत्तेजित झालं की त्या पंज्यावद्दल हे किंवा असलंच एखादं घाणेरडं स्वप्न त्याला पडे..आणि तो रात्रीचा दचकून, घावरून जागा होई ...एका निषिद्ध सृष्टीचं दर्शन घेतल्याचं हे कदाचित प्रायश्चित्त असेल ! !

**[ कथेची सुरुवात आधारित ]**

● ● ●




**जय नांवाचा इतिहास ● ब्रम्हदेवाचा बाप ● आंधळी कोशिंबीर**

## द्रौपदी ही श्रीकृष्णाची मैत्रिण

रामायण आणि महाभारत हे हिंदूंचे आणि हिंदू संस्कृतीचे प्राचीन ग्रंथ आहेत. हजारो वर्षे झाली तरीही या ग्रंथांची आजतागायत पारायणे केली जात आहेत. काळ जसजसा प्रगत होत चालला तसतसा लोकांच्या बुद्धीचाही विकास होत गेला असे दिसून येते. माणूस अधिक विचार करू लागला आणि त्यातून एक नवी विचारसरणी बाहेर पडली. जुने ग्रंथही नव्या विचारसरणीतून अभ्यासिले जाऊ लागले. अशा या बदलत्या काळातच जुन्या ग्रंथांकडे विचारवंतांनी आपले लक्ष केंद्रित केले. एक नवा बुद्धिवादी दृष्टिकोण ठेवून जुने वाङमय हाताळले गेले आणि त्यातून स्वतंत्र विचारांचा उदय झाला. महाभारताकडेही अशाच एका नव्या दृष्टिकोनातून श्री. आनंद साधले यांनी पाहिले आहे. आणि आपल्या विचारमंथनातून त्यांनी "**हा जय नांवाचा इतिहास** आहे" हा ग्रंथ लोकांसमोर ठेवला आहे.

महाभारतकालीन समाज आणि आजचा समाज यातील बौद्धिक क्रांति लक्षात घेऊन लेखकाने प्रस्तुत ग्रंथ लिहिला आहे. भगवान श्रीकृष्ण हे तर तमाम हिंदूंचे परम दैवत आहे. त्या दैवताबद्दल कुणीही शंका घेण्याचे कारण नाही. हाच विचार श्री. साधले यांनी महाभारतावरील आपल्या या ग्रंथात टीकेसह नमूद केला आहे. द्रौपदीबद्दलचे जे कुतुहल विचारवंतात फार माजले आहे त्याबद्दलही श्री. साधले यांनी फार सुंदर विचार मांडले आहेत. ते म्हणतात, 'द्रौपदी ही श्रीकृष्णाची एक मैत्रिण होती आणि म्हणूनच तिच्या कल्याणाचे योग्य ते सर्व प्रयत्न श्रीकृष्णाने केले होते' श्रीकृष्णानेच भारतीय युद्ध हे धर्मयुद्ध नसून युद्धधर्म आहे हे शिकविले आहे. युद्धधर्म कोणता, राजनीती कोणती या प्रश्नांचे समर्पक उत्तर श्रीकृष्णानेच दिले आहे असे श्री. साधले यांचे मत या ग्रंथात व्यक्त झालेले दिसून येते.

महाभारतात चमत्कार आणि कल्पनेला न पटणारे असे प्रसंग अनेक आहेत. पण फार मोठ्या वादात न शिरता या सर्व प्रसंगांकडे लेखकाने जाणूनबुजून दुर्लक्ष केल्याचे दिसून येते. त्यामुळे श्रद्धाळू लोकांना फारसा धक्का दिला जात नाही. पण याचा अर्थ ते सर्व चमत्कार आणि कल्पनेला न पटणारे प्रसंग लेखकाला मान्य आहेत असे मात्र नाही. वाचकांवरच लेखकाने अशा सर्व गोष्टींचे सत्यान्वेषण करण्याचे सोपविले आहे.

राजनीतीला अनुसरून युधिष्ठिराला लेखकाने कवडीचीही किंमत दिलेली नाही. 'हा जय नांवाचा इतिहास आहे', 'भिक्षेप्रमाणे वाटून खा,' 'मलाही बायको हवी', 'जेथे धर्म तेथे विजय,' 'आमचा एकांत पाहू नये,' 'युधिष्ठीर जिवंत असता सुखाचे नांव कशाला,' 'तू असशील तशी समोर ये', 'शेषप्रश्न' आणि 'हा जय तुमचे कल्याण करो' ही सर्व प्रकरणे श्री. साधले यांनी मोठ्या तळमळीने लिहिली आहेत. ती वाचत असता वाचकालाही सत्य घटनांचे यथार्थ दर्शन झाल्याशिवाय रहात नाही. महाभारतात भगवान श्रीकृष्णाच्या खालोखाल लेखकाने जर थोर व्यक्ती कुणाला मानली असेल तर द्रौपदीला. द्रौपदीबद्दलचे विचार ज्या पद्धतीने या ग्रंथात लेखकाने मांडले आहेत ती पद्धत जिज्ञासू वाचकाला आणि विचारवंताना विचार करायला लावील अशी आहे. द्रौपदीच्या व्यक्तिरेखेने महाभारतातील इतर अनेक व्यक्तींवर त्यामुळे झगझगीत प्रकाश पडला आहे. कल्पित काय आहे आणि सत्य काय आहे याचा उलगडा या ग्रंथातून वाचकाला होतो.

महाभारतावर आजकाल होत असलेल्या टीका वाचल्यानंतर श्री. साधले यांनी महाभारताविषयी विशेषत: त्यातील व्यक्तींबद्दलचा मांडलेला विचार तर्कशुद्ध वाटतो. हजारो वर्षांची परंपरा अखंडितपणे चालू आहे म्हणून ती परंपरा श्रेष्ठ आहे असे म्हणण्याचा काळ आता निघून गेला आहे. कल्पित कोणते आणि सत्य कोणते याचा विचार करण्याचा आजचा काळ आहे. श्रद्धा नसावी असे श्री. साधले यांचेही मत नाही पण श्रद्धासुद्धा बुद्धीला पटणारी पाहिजे. त्यातून वास्तव स्थितीचे दर्शन घडायला हवे असा आग्रह श्री. साधले यांचा 'हा जय नावाचा इतिहास आहे,' हा ग्रंथ लिहिताना आहे.

**–दिवाकर खांडेकर**

## विसंगतीची 'झालर' लावलेल्या कथा

व. पु. काळे यांच्या चौदा कथांच्या या संग्रहातील बहुतेक कथा विनोदी व चुटकेवजा आहेत. प्रत्येक कथा ही जीवनातील विसंगतीचे किंवा गंमतीदार घटनेचे मजेशीर दर्शन घडविते आणि वाचकाला गुदगुल्या करीत सहजपणे संपते. प्रस्तुत संग्रहातील विनोदी कथांचे स्वरूप दोन प्रकारचे आहे. पहिल्या प्रकारच्या कथात केवळ काल्पनिकता आहे. अशा कथा तर्कशास्त्रातले प्रश्न न विचारता गंमत म्हणून वाचायला बऱ्या वाटतील. उदा. 'ब्रह्मदेवाचा बाप' या कथेत प्रत्यक्ष ब्रह्मदेव हजर होणे; 'क्लाऊज' कथेतील निरनिराळ्या क्लाऊजांचे संभाषण; 'नांदा सौख्यभरे'मधील फोटोंची अदलाबदल व तशीच जोडपी पुन्हा वार्ताहराला भेटणे, कथा दुरुस्ती करणारा मनुष्य लेखकाला भेटणे, इ. या उल्लेखिलेल्या कथांतील

काल्पनिकतेमुळ कथा ही गंमतीदार घटना म्हणून लक्षात राहते. दुसऱ्या प्रकारच्या विनोदी कथा म्हणजे प्रत्यक्ष जीवनातील विसंगत घटनांवर आधारलेल्या कथा होत. 'शिकार' कथेतील सासऱ्याची जावई शिकारी असावा ही अट व त्यातून निर्माण होणारे घोटाळे, आपल्या स्पर्शज्ञानाबद्दल आत्मविश्वास असणारी व चप्पल हरविणारी आई मुलाला वेंधळेपणाबद्दल दोष देते पण ती बाहेर जाताना दोन वेगवेगळ्या तऱ्हेच्या चपला घालून बाहेर पडलेली असते या घटनेतील विसंगती पाहण्यासारखी आहे. या विनोदी घटनांवर आधारलेल्या कथा काल्पनिक कथांपेक्षा वेगळ्या आहेत आणि वेधक पण. 'हॉलिडे कँप' या कथेतील तरुणी गाडीत बसलेल्या तरुणाशी थोडेसे सलगीने बोलते व आपण मागच्या गाडीने जात असल्याचा बहाणा करते. तिच्या लाघवीपणावर खूष झालेला प्रवासी तरुण आपली खिडकीतील जागा सोडतो. गाडी सुटताना ती मुलगी त्या तरुणाची जागा आपल्या भावास देते. तिचे हे कपटनाटक पाहून प्रवासी तरुण हतबुद्ध होतो. व. पु. काळयांच्या या विनोदी कथांचे शेवट चमकदार व वाचकाला सहज चकविणारे आहेत. त्यांच्या विनोदी कथांचे हे प्रमुख वैशिष्टच होय.

'प्रपोजल' व 'सोळा जानेवारी' या कथात मनुष्य स्वभावाचे दर्शन होते. 'प्रपोजल'मधील कारकून ऑफीसमध्ये नवीनच आलेल्या मुलीला 'मॅच' ठरणाऱ्या मुलांची मनात उगाचंच जुळणी करतो. ऑफीसमध्ये काम करणाऱ्या मुलीची प्रसूतीची तारीख सोळा जानेवारी आहे हे माहीत असलेले कारकून त्याच दिवशी रजा घेतात. हेडक्लार्कपण आफीसमध्ये आल्यावर हॉस्पिटलला फोन करतात. (वर उल्लेख केलेल्या काल्पनिक कथांप्रमाणे या कथेतील संभवनीयता पण विचारात घ्यायची नाही!)

प्रस्तुत संग्रहातील 'सोयरीक' व 'दांपत्यसुखाचे रहस्य' या गंभीर वळणाच्या कथा आहेत. आप्पा दांडेकर नांवाच्या अपरिचित गृहस्थाची स्थळांची यादी असलेली वही पंत परत न करताच आपल्याजवळ ठेवतात. आपटे नांवाचे त्या वहीतील स्थळ पाहून आपल्या मुलीचे लग्न जमवितात. लग्नाला आलेल्या आप्पा दांडेकर आपटयांच्या घराण्यातील बाहेरख्यालीपणाविषयी उल्लेख करतात व मांडवात असलेल्या पंताना ते अभावितपणे समजते. 'दांपत्यसुखाचे रहस्य' या कथेचा शेवटही असाच कारुण्यपूर्ण झाला आहे.

या दोन कथांचे अपवाद वगळता इतर कथा विनोदी व चुटकेवजा आहेत. गांभीर्य हा त्यांचा स्थायीभाव नाही. गंमतीदार घटनांचे हलकेफुलके चित्रण करणारी कथा या शब्दांत व. पु. काळयांच्या कथांचे वर्णन करता येईल.

–वि. शं. चौघुले

[ **ब्रह्मदेवाचा बाप**. लेखक श्री. व. पु. काळे; जे. विनायक प्रकाशन; किंमत तीन रुपय. पृष्ठ १२३ ]

----

## जीव अस्वस्थ करणारी कथानके

गाजलेल्या पांच इंग्रजी चित्रपटकथांचा हा मराठी अनुवाद श्री. उमाकांत ठोमरे यांनी आपल्या ओघवत्या व लालित्यपूर्ण शैलीत पुस्तक रूपाने सादर केला आहे. 'दि गन्स ऑफ नॅव्हरॉन' (विजय), 'दि वर्ल्ड ऑफ सुझी वाँग' (सुझी वाँगचे जग), 'बॅक स्ट्रीट' (दुसरी सावली), 'रिअर विंडो' (खिडकी) आणि 'पेटन प्लेस' (आंधळी कोशिंबीर) या पाचही चित्रपटांची चित्ररसिकांच्या मनावरील मोहिनी अद्याप कायम आहे.

'गन्स ऑफ नॅव्हरॉन' म्हणजे दुसऱ्या महायुद्धात दोस्त राष्ट्रांच्या सैन्यातील, निधड्या छातीचा सहा झुंजार सैनिकांनी आपल्या रक्ताने रंगवलेली विलक्षण शौर्यगाथा. हा चित्रपट ज्याप्रमाणे प्रेक्षकांचे लक्ष प्रथमपासून अखेरपर्यंत सतत वेधून घेतो, त्याप्रमाणे ही चित्रपटकथाही अतिशय रोमांचकारक वाटते. नॅव्हरॉनच्या दुर्गम कड्यावरील गुहात नाझींनी दडवून ठेवलेल्या दोन महा विध्वंसक जर्मन तोफा निकामी करण्यासाठी हे महा वीर आपल्या प्राणांची कुरवंडी करण्यास कसे सिद्ध होतात त्याचे वर्णन मोठे रसरशीत वठले आहे.

'सुझी वाँगचे जग' ही हाँगकाँगच्या पार्श्वभूमीवरील एक आगळीवेगळी प्रणयकथा आहे. त्या वैभव नगरीच्या काळजात कर्करोगाप्रमाणे चिघळणाऱ्या झोपडपट्टीमधील एका मातेच्या वात्सल्याची व प्रणयाची कहाणी सहृदय वाचकांचे मन हेलावून सोडील.

'आंधळी कोशिंबीर' या चित्रपटकथेत सत् आणि असत् यांजमधील सनातन संघर्ष चित्रित करण्यात आला आहे. विवाहबाह्य संबंधातून जन्मलेल्या आपल्या मुलीला तारुण्यसुलभ मोहापासून दूर ठेवण्यासाठी जीवाची शर्थ करणारी पण स्वतःच दडपलेल्या विषयवासनेच्या आहारी जाणारी कॉन्स्टन्स ही या कथेतील प्रमुख व्यक्तिरेखा वाचकाच्या मनात सहानुभूती निर्माण करते. सावत्र बापाच्या सैतानी लालसेस बळी पडणारी आणि अखेरीस त्याचा खून करणारी सेलेना क्रॉस ही आणखी एक विलक्षण व्यक्तिरेखा. मानवी विचार विकारांच्या, मती गुंग करणाऱ्या या गुंतागुंतीमुळे 'आंधळी कोशिंबीर' ही चित्रपटकथा वाचकास अगदी अस्वस्थ करून सोडते.

–वसंत पोरेडी

[ **आंधळी कोशिंबीर**. श्री. उमाकांत ठोमरे, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई-२ मूल्य ४ रुपये. ]





अनुक्रमणिका




## मीटर तरी बंद कर!

शेठ घेलाचंद एकदा उटकमंडला गेले होते. दूरवर फेरफटका करण्यासाठी त्यांनी एक टॅक्सी ठरविली. उतरंडीला टॅक्सी भरधाव वेगात पळू लागली. प्रथम शेठजीना वाटले, उतरण आहे म्हणून जोरात पळत असेल. परंतु गाडीचा वेग बराच वेळ झाला तरी कमी होईना म्हणून शेठजींनी ड्रायव्हरला विचालले, "टॅक्सी कां अशी वेगात पळते आहे?"

"शेठजी ब्रेक निकामी झाले आहेत. दुसरं काही नाही."

हे ऐकून शेठजी ड्रायव्हरवर खेकसले–"मग तेवढे मीटर बंद कर ना!"

## 'भवानी'चे गिऱ्हाईक

ठकूताई व्यवहारात भारी पक्क्या. ह्यामुळे कोणाचाही सल्ला त्यांना पटणार नाही. त्यांनी जर विचारले "किती वाजले?" आणि तुम्ही उत्तरला "चार वाजले" तर त्या लगेच म्हणतील "छे, एक मिनीट कमी आहे चार वाजायला."

एकदा ठकूताई मंडईत भाजी आणायला गेल्या होत्या. रसरशीत टोमॅटो पाहून ठकूताईंनी भाव विचारला.

"दीड रुपया किलो, बाई"

"छे, भलताच भाव सांगतोस. रुपया किलो दे.

"बरं, घ्या. भवानी होऊन जाऊ द्या."

"भवानी असेल तर आठ आणे किलो दे."

"बरं, घ्या. किती घेणार?"

"दोन किलो घेते चल. चार आणे किलो देतोस?"

हे ऐकून त्या भाजीवाल्याने पाठ फिरविली व म्हटले, "बाई, लवकर पिशवीत भरा हवे तेवढे टोमॅटो चोरून. कितीही झाले तरी भवानीचे गिऱ्हाईक मी सोडू इच्छीत नाही. हं आटपा लवकर!"

* * *

● कलकत्त्याच्या नॅशनल लायब्ररीतून आतापर्यंत दोन लाख पुस्तके 'लंपास' झाली आहेत.

● १९६७।६८ साली रीझर्व-बँकेत ४,९४७ खोट्या नोटा जमा करण्यात आल्या होत्या. त्यांची किंमत ७४,३६९ रुपये इतकी होती.

* * *

## अगोदरच्या स्टॉपवर उतरा

प्रा. दशपुत्रे म्हणजे एक वल्ली आहे. नेहमी विचारात दंग. एकदा ते बसने दादरला चालले होते. त्यांच्याबरोबर माहीमला एक इसम चढला. तो नेमका त्यांच्या शेजारी बसला.

थोड्या वेळाने तो त्यांना म्हणाला, "साहेब, खोदाद सर्कल आले की सांगा हं. मी मुंबईला नवीन आहे तेव्हा तसदीबद्दल माफी असावी."

यावर प्राध्यापक हसून म्हणाले, "अहो तसदी कसली त्यात? मी कुठे उतरतो ते लक्षात ठेवा आणि त्याच्या अगोदरच्या 'स्टॉप'वर उतरा म्हणजे झालं!"

## दररोज एक हजार आत्महत्या

'जागतिक आरोग्य संघटना' (W.H.O.) ह्या संस्थेने नुकतीच 'आत्महत्त्या' ह्या विषयावर पाहणी केली. त्यात त्यांना असे आढळून आले की दरवर्षी जगात पाच लाख 'आत्महत्त्या' नोंदविल्या जातात व ह्याच्या आठपट आत्महत्त्येचे प्रयत्न केले जातात. म्हणजे आत्महत्या करणाऱ्यांची सरासरी दररोज १,००० पडते!

## शेवटची कविता

एकदा एका संपादकाने एका कविराजांची खाशी गंमत केली. ह्या संपादक महाशयांकडे ह्या कविराजांनी अनेक कविता पाठविल्या परंतु एकही कविता छापली नाही की साधी पोच दिली नाही. शेवटी कविराज क्रुद्ध झाले व त्यांनी ठणकावून संपादकांना पत्र लिहिले–"मी आपल्याकडे अनेक कविता पाठविल्या परंतु आपण प्रामाणिक असाल तर निदान माझ्या शेवटच्या कवितेवर तरी मत प्रकट करा!"

संपादक महाशयांनी त्वरित उत्तर लिहिले "आपल्या म्हणण्याप्रमाणे ही कविता आपली शेवटचीच असल्यामुळे ह्यावर मी आपले मत लवकरच कळवितो!"

## बापाची पेंड

एका सधन शेतकऱ्याचे चिरंजीव पुण्यनगरीत शिक्षणास होते. वडिलांकडून महिन्याच्या खर्चास आलेले दोनशे रुपये आठवड्यात उधळून टाकल्यावर त्यांनी वडिलांस पत्र पाठविले.

'पैसे संपले आहेत. त्वरित शंभर रुपये पाठवावेत इ. इ..

पत्र पहाताच वडीलांचे माथे भडकले. वडीलांनी चिरंजीवांना स्पष्टीकरण देण्याबद्दल पत्र पाठविले.

"आठवड्यापूर्वी पाठविलेल्या दोनशे रुपयांचे काय केले? सविस्तर खुलासा उत्तरी पाठवावा. .इ. इ."

चिरंजीवांनी पत्र वाचले व उत्तरी कळविले.

"आपले पत्र पोहोचले. माझ्याकडे खुलासा मागण्याचे कारण नाही. मी माझ्या बापाकडून पैसे मागतो त्यात तुमच्या बापाचे काय गेले?"

—दि. भी. कराडकर

[पृष्ठ ४२ वरून]

पंडित असलेला माणूस रसिकतेशी रममाण झाला म्हणजे तो कोणते आश्चर्य जन्माला घालू शकतो याचे हा लेख म्हणजे मोठे रसाळ उदाहरण आहे. मराठी समाजात दृढमूल झालेल्या लावणीची परंपरा अतिशय शास्त्रीय शिस्तीने शोधत शोधत धोंड ज्ञानेश्वरी, काव्यानुशासन, राजतरंगिणी अशा ग्रथांच्या आधारे हजारो वर्षे मागे गेले आहेत. लावणीचे मूळबीज त्यांनी भारतीय संस्कृतीच्या परंपरेत वसविले असून लावणीचे कुलगोत उंचावले आहे. प्राध्यापक धोंड यांचा उल्लेख मराठी साहित्यातील धोंड असा विनोदाने केला जातो. प्राध्यापक धोंड हे धोंड आहेत पण साधी सुधी नव्हे. ते मैलाची धोंड आहेत.

## संत-पंडितांचा सहवास

लावणीनंतर आता संतांच्या आणि पंडितांच्या संगतीत शिरणे बरे.

इथे पहिले मानकरी कै. प्रा. श्री. म. माटे होत. 'अजान वृक्षाच्या छायेत' (१९४६) हा त्यांचा लेख इंद्रायणीच्या पंचक्रोशीची प्रतिष्ठा वर्णन करणारा आहे. आधीच हा परिसर पुण्यपावन. त्यातच ज्ञानेशाची समाधी इथे आल्यावर अजान वृक्षाच्या छायेत आनंद आणि शांती याची लयलूट झाली असे माटे वर्णितात. 'संत वाङमयातील रांडापोरे' (१९४९) या लेखात स्त्रियाना उठल्या सुटल्या भडक शिव्या देणाऱ्या संताचा समाचार त्यांनी घेतलेला आहे. संतांना मातेची प्रतिष्ठा मानावयाची असेल तर प्रत्येक माता ही माता होण्याआधी कांता असते हे त्यांनी ध्यानात ठेवावे आणि मातेविषयी भक्ती बाळगावयाची असेल तर स्त्रीविषयी निदान ओलावा ठेवावा असे माटे म्हणतात. 'एक पुराणी मास्तरीण' या लेखात (१९५५) माटे मनाला झोंबणारी दु:खे आणि पोखरणाऱ्या काळज्या यावरील उतारा कला हा आहे असे प्रतिपादन करून जीवन आणि कला यांच्या अनेकविध नात्यातील एका नात्याचा विचार करतात.

श्री. अ. का. प्रियोळकर यांनी 'विठ्ठलाचा कानडातील इतिहास' (१९५०) या लेखात विठ्ठलाच्या मूर्तीच्या विजयनगर येथील मंदिरातील रिकाम्या स्थानाबाबत चर्चा केली आहे. तुकाराम, नामदेव यांच्या अभंगाच्या आधारे त्यांनी हा मागोवा घेतलेला आहे. म. भा. भू. ज. र. आजगावकर यानी त्यांच्या 'चालणारी भिंत' (१९५०) या लेखात संत चरित्रांशी निगडित असणाऱ्या चमत्कारांचा विचार केलेला असून अतींद्रिय शक्तीच्या योगे असे चमत्कार संभवनीय असतात असे प्रतिपादिले आहे. 'अमर अश्रू' (१९५०) या लेखात सौ. मृणालिनी देसाई यांनी गिरिधर गोपालाची सतत वाट पहाणाऱ्या मीरेच्या अमर अश्रूतील वेदनेची कणव आकाराला आणली आहे. अंती मीरा स्वत:च्या हृदयाचा कुंभ भक्तिभावाने भरून स्वत:च प्रभूचा नैवेद्य बनते असा त्यांच्या लेखाचा शेवट आहे. श्री. भा. श्री. परांजपे यांचा 'संतसाहित्यातील नटनाट्य' (१९६३) हा लेख संताच्या साहित्यातील अभिनयसुलभ स्थळे आणि संगीत यांचा विचार करणारा आहे.

## संकीर्ण लेखनातही दूरगामी दृष्टी

इतर काही स्फुट स्वरूपाच्या लेखात अनेक संकीर्ण विषय आलेले आहेत. श्री. कृ. रा. देसाई यांनी 'भारताचा राष्ट्रीय पक्षी' (१९६२) या लेखात शारदेचे वाहन असलेल्या मोराचा मागोवा पुराणाच्या आधारे घेतला असून इतरही अनेकविध रंजक माहिती लालित्याने सांगितली आहे. श्री. भय्यासाहेब ओंकार यांनी 'रामायणातील ललितकला' (१९६१) या लेखात वाल्मिकी रामायणातील कलाविषयक उल्लेखावरून येणारी तत्कालीन नानाविध कलांची माहिती दिली आहे. त्यांच्याच 'भूतलावरील स्थिरावलेल्या देवांगना' (१९६५) या लेखात अजंठ्याच्या लेण्यातील एका समूहचित्राचे रसग्रहण केलेले आहे. श्री. चिं. गं. कर्वे यांनी 'शेज आणि शेजघर' (१९५४) या शय्याविषयक खुसखुशीत निबंधात वेदकालापासून आजपर्यंतच्या शेजेवरील प्रगतीचा रसिक आढावा घेतलेला आहे. पंडित महादेवशास्त्री जोशी यांनी 'स्तोत्रकलाप' (१९५९) या लेखात स्तोत्रे ही त्यातील भक्तिरसाच्या ओलाव्यामुळे श्रद्धाळू जनाचा जीवनविसावा कसा होतात हे वर्णिलेले आहे. विश्वगुणादर्श या संस्कृत ग्रंथातील 'महाराष्ट्र वर्णन' (१९५९) नलचंपूतील 'विदर्भ वर्णन' (१९५९) चक्रधरस्वामीच्या उपदेशातील 'महाराष्ट्री वसावे' हे प्रकरण (१९५९) असे उतारेही प्रसंग साधून 'दीपावली'ने अतिशय औचित्याने उद्धृत केले आहे. नौकानयन खास अंकातील वेदोक्त 'वरुणसूक्त' अथवा वैमानिक खास अंकातील वेदोक्त 'मरुत्स्तुती' याच औचित्याची लक्षणे आहेत. चीनच्या लढाईच्या वेळी श्री. उपाकान्त यांनी 'भारता ऊठ आणि युद्ध कर' (१९५९) अशा प्रकारची अनेक स्फुटे ज्ञानेश्वरी, गीता, दासबोध यांच्या आधारे प्रवचनाच्या

स्वरूपात लिहिली आहेत. एकाद्या पृष्ठावर मोकळ्या सुटणाऱ्या जागेत संस्कृत ग्रंथातील रमणीय श्लोक 'पानपूरके' म्हणून सार्थ आणि सचित्र देण्याची प्रथा प्रथम 'दीपावली'नेच सुरू केली आणि इतर अनेकांनी नंतर ती हातोहात उचलली. आणखीही दोन स्फुटलेखांचा उल्लेख इथे करावयास हवा. श्री. कृ. द. दीक्षित यांनी 'रागानुराग' (१९५१) या लेखात त्या अंकातील रंगीत चित्रांवर भाष्य केलेले आहे. रागातील भावाशय शब्दांकित करणारे ते शब्दचित्र सुन्दर वठलेले आहे. श्री. ग. दि. माडगूळकर यांनीही (१९५९) मध्ये त्यावर्षीच्या ऋतुसंहार या चित्रमालेवर काव्यात्म भाष्य केलेले आहे ते मनोज्ञ आहे.

## सामाजिक नि सांस्कृतिक दर्शन

'हिमालयो नाम नगाधिराजः' या आपल्या सुन्दर लेखात (१९५३) श्री. मल्हार विनायक आपटे यांनी हिमालयातील भूस्तरांचे वर्णन करून तो पर्वत पृथ्वीच्या आकाराचाच नव्हे तर आयुष्याचाही मानदंड कसा आहे हे वर्णिले आहे. श्री. अ. सी. केळुसकर यांनी 'मृताची नगरी', (१९६०)या लेखात हरप्पाच्या संस्कृतीचा परिचय घडविला आहे. म. म. द. वा. पोतदार यांनी 'सा रम्या नगरी' (१९५१) या लेखात तक्षशीला या नामशेष नगरीचे सौंदर्य दाखविले आहे. 'महाराष्ट्र देश सुन्दरा' (१९५५) या अनेक नामवंत लेखकांनी रंगविलेल्या परिसंवादात महाराष्ट्रातील वेगवेगळ्या भूभागातील मराठी जनतेचे सामाजिक आणि सांस्कृतिक दर्शन घडते. 'देश मराठी, लोक मराठी, मराठीच भाषा' (१९५६) हा असाच दुसरा परिसंवाद. यात महाराष्ट्रातील वेगवेगळ्या जातींचे पण जातीय नसलेले सामाजिक व सांस्कृतिक चित्रण हसतखेळत घडविलेले आहे. 'मराठी माणूस १९२०–१९६०' (१९६०) हा असाच एक महत्वाचा परिसंवाद. यात मराठी संस्कृतीतील बदलाचा हसताखेळता आलेख काढलेला आहे. कै. का. दा. नायक यांनी "गोमंतकाची संस्कृती" (१९५४) या विद्वत्तापूर्ण लेखात गोमंतकीय संस्कृतीतील गोपसंस्कृतीचे मूळ शोधलेले आहे. 'हेमाडपंत' (१९६७) हा त्यांचा दुसरा संशोधनपर लेख आहे. त्यात त्यांनी हेमाडपंताच्या मूलस्थानाचा शोध घेतलेला असून या लेखात त्यांच्या निरभिनिवेश दृष्टीचा प्रत्यय येतो.

प्रत्यक्ष वेदावरच आधारलेले दोन लेख 'दीपावली'त आले आहेत. "वेदातील नौकानयन" (१९६७) हा प्रा. शांताराम जोग यांचा लेख त्यांच्या व्यासंगाची साक्ष देतो. वेदकाली नौकायुद्धापर्यंत नौकानयनाची प्रगती झाली नव्हती हे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले आहे. श्री. हरिहर उर्सेकर यांचा 'वेदातील सोम' (१९६२) हा लेख वेदातील अपेयपानाची परंपरा विशद करणारा आहे.

श्री. उर्सेकर यांचाच 'शृंगार की भक्ती' (१९५१)हा लेख गीतगोविंद या विश्वविख्यात काव्याचा सर्गवार परिचय करून देणारा आहे. हा विद्वत्तापूर्ण लेख अतिशय रसाळ असून त्यात त्यांनी बांधेसूद रचना, भाषासौंदर्य, नादमाधुर्य इ. जयदेवाच्या गुणांचा तसाच आत्मश्लाघा या त्यांच्या दोषाचा परिचय घडविला आहे. शृंगारपर दिसणाऱ्या या काव्यात भक्तीही आहे असे त्यांचे प्रतिपादन आहे. वाचकांची दृष्टी असेल तसा प्रत्यय त्याला यावा असे ते म्हणतात. श्री. ग. त्र्यं. देशपांडे यांनी 'अमरुशतक' (१९५८) या आपल्या विद्वत्तामंडित आणि रसपेशल लेखात उर्सेकरांप्रमाणेच अमरुशतकाचा परिचय करून दिलेला आहे. या लेखात रतिभावनेच्या स्वरूपाची पांडित्यमनोहर चर्चाही असून अमरूच्या काही निवडक मुक्तकांच्या आधारे कामशास्त्रीय सिद्धांत आणि संकेत यांचे स्पष्टीकरण केलेले आहे. "शृंगार-श्रीरंग" हा(१९६०) श्री. राजा बढे यांनी केलेला जयदेवाच्या गीतगोविंदाचाच संपूर्ण पद्यमय अनुवाद मराठी भाषेचे भूषण ठरावा असा आहे. श्री. बढे यांची नजाकतदार शब्दकळा गीतगोविंदाला न्याय देण्यास समर्थ आहे. मूळ काव्याशी पैजा जिंकणारा हा अनुवाद ग्रंथरूपाने प्रकाशित व्हावयास प्रत्यवाय नसावा. गीतगोविंदाची गोडीच अशी आहे की कितीही अनुवाद प्रसिद्ध झाले तरी नव्या अनुवादाला जागा असतेच. "वरदावी पयस्विनी" (१९६२) हे रघुवंशाच्या संपूर्ण दुसऱ्या सर्गाचे पद्यमय भाषांतर महाकवी वा. भ. बोरकर यांनी केलेले आहे. बोरकर यांच्या कवित्वाचे वर्णन करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे शब्दाचा थिटेपणा प्रकट करणे आहे. बोरकरांना एवढीच प्रार्थना करावयाची की त्यांनी त्यांची ही अंगीकृते पुरी करावी आणि मराठीला उपकृत करावे. विदग्ध काव्याशी संबंधित अशा या लेखाबरोबरच शंकर वैद्य यांच्या 'वाल्मिकीचे डोळे' (१९६०) या लेखाचा उल्लेख करावयास हवा. या लेखात त्यांनी वाल्मिकी रामायणात आलेल्या साऱ्या दृष्टिविषयक उल्लेखावर अतिशय काव्यात्म आणि रसाळ असे भाष्य केले आहे.

## जुन्या कथाः नवे अर्थ

यानंतर जुन्या कथांवर नव्या अर्थांचा प्रत्यय बसविणाऱ्या काही महत्त्वाच्या लेखाचा उल्लेख करावयाचा आहे. हे लेख महत्त्वाचे आहेत. त्यांचा पुरेसा परिचय धावत्या आढाव्यात घेता येणार नाही. यातील पहिला लेख "कुरुक्षेत्रावर घडलेली नवलकथा" (१९५२) श्री. दि. के. बेडेकर यांचा आहे. यात त्यांनी महाभारतातील गीताकथनाच्या चौकटीच्या आधारे नव्या युगधर्माचा संदेश दिला असून मानवजातीपुढे उज्ज्वल भविष्य आहे की सर्वस्वनाश आहे याची चिकित्सा स्पर्शिली आहे. श्री. पद्माकर गोवईकर यांचा "सहदेवा थोडा अग्नी आण" (१९६२) हा युधिष्ठिर पश्चात्ताप करीत आहे अशा स्वरूपाचा लेख अत्यंत ज्वलंत स्वरूपाचा असून युधिष्ठिरावरील सर्व परखड लेखात अग्रगामी ठरावा असा आहे. श्री. गोवईकर यांच्या प्रतिभेचा एक अत्यंत उज्ज्वल उद्रेक असा हा लेख आहे. श्री. वा. रा. कान्त यांचे दोन लेख यानंतर विचारात घ्यावयाचे. "कुंतीचा

गर्भ" (१९६५) या लेखात त्यांनी जीवनातील नव्या अनुभवाशी इमान न राखणाऱ्या कुंतीची कथा आणि व्यथा वर्णिली आहे. "उर्वशी" (१९६६) या लेखात त्यांनी इंद्रियसुभग अशा जगातून अतींद्रिय आंतरिक जगात जाण्यासाठी तळमळणाऱ्या भावनांचे स्वरूप या दृष्टीने उर्वशीच्या कथेचा विचार केला आहे. पार्थीव आणि दैवी यांचा संघर्ष या स्वरूपात ही कथा वर्णिणाऱ्या या अर्थगर्भ लेखाचे स्वरूप जिवंत गद्यकाव्यासारखे आहे. कांत याच्या प्रतिभेचा हा आविष्कार विचारी वाचकाला रोचक खाद्य पुरविणारा आहे. श्रीमती आशा केळकर यांची 'धाव' (१९६९) ही कथाही याच स्वरूपाची आहे. राधा आणि कृष्ण यातील प्रीतीचा हा नवा विचार खरोखरच नवा आहे आणि धाडसी आहे. अनेकांना तो पटवून घेणे कठीण आहे. आणि यातच त्या विचाराचे मोठेपण आहे. कदाचित प्रतिकूल टीका झाली तरी श्रीमती केळकर यांनी वावरू नये. त्यांची विचार करण्याची शक्ती हे मोठे सामर्थ्य आहे. ते त्यांनी जोपासावे.

## 'दीपावली'चे मानबिंदू

इथे या लेखाच्या अंत्यपर्वाला आरंभ होतो. या पर्वात दोन थोर लेखकांचा विचार करावयाचा आहे. यातील पहिले लेखक श्री. पां. भा. डिंगरे हे होत. त्यांनी १९५३ च्या दिवाळी अंकात "श्रीकृष्णाने अर्जुनाचा रथ नरकात नेला" हा प्रदीर्घ लेख लिहिला. या लेखात त्यांनी गीता आणि तिच्यातील उपदेशाच्या अनुषंगाने महाभारत याचा अत्यंत परखड विचार केला. पांडवांवर आलेल्या आपत्तीने व्यावहारिक मूल्यमापन केले. आणि

**यत्र योगेश्वर कृष्ण यत्र पार्थो धनुर्धरः ।।**
**तत्र कुलक्षयोनाशी नर्को भारत निर्णयः ।।**

असा निष्कर्ष श्री. डिंगरे यांनी काढला आणि विचाराच्या स्वातंत्र्यावर पूर्ण निष्ठा असणाऱ्या 'दीपावली'कारांनी तो छापला. या लेखाच्या प्रकाशनाने मोठी

# ख्यातनाम इतिहासज्ञाला श्रद्धांजली



इतिहासाचे संशोधन हेच ज्याचे जीवन बनले होते असे गोमंतकाचे सुपुत्र आणि ख्यातनाम इतिहासज्ञ डॉ. पांडुरंग सखाराम पिसुर्लेकर यांचे दि. १० जुलैला दीर्घकालीन आजारानंतर पणजी येथे दुःखद निधन झाले. गेल्या जूनमध्येच वयाची पंचाहत्तरी गाठली म्हणून त्यांचा अमृतमहोत्सव रुग्णालयातच साजरा झाला होता. त्यानंतर अवघ्या पंधरवड्यातच त्यांच्या निधनाची बातमी यावी हा दैवदुर्विलास होय.

गोव्यातील पिसुर्ले या खेड्यात १८९४ मध्ये त्यांचा जन्म झाला. यथाक्रम शिक्षण घेऊन ते १९१६ साली वकील झाले; पण वकिलीचा व्यवसाय करून द्रव्यसंचय करण्याचा राजमार्ग सोडून ते शिक्षण क्षेत्रात शिरले यातच त्यांच्या ध्येयवादी जीवनाचे पहिले दर्शन घडले. त्यांनी शिक्षकाचा पेशा पत्करला तरी विद्यार्थीवृत्ती सोडली नाही. या त्यांच्या जिज्ञासू वृत्तीमुळेच इतिहासाचार्य राजवाडे यांचे गोव्यातील आगमन हे त्यांच्या जीवनाला एक वेगळीच कलाटणी देणारे ठरले. इतिहास-संशोधनाची त्यांना गोडी लागली आणि त्यासाठी वाटेल ते दिव्य करण्याची आणि कष्ट पत्करण्याची त्यांनी तयारी केली. इतिहास ग्रंथांतील पुराव्यांचा तौलनिक अभ्यास स्वतःलाच करता यावा म्हणून त्यांनी अनेक भारतीय आणि युरोपीय भाषांचा अभ्यास केला आणि त्या भाषांचा केवळ परिचयच करून न घेता त्यावर प्रभुत्व मिळविले.

इतिहास-ग्रंथांनी त्यांच्यावर इतकी मोहिनी टाकली की त्यांनी गोव्याच्या पुराभिलेख-संग्रह कार्यालयात विनावेतन काम करण्याचीही तयारी दर्शविली. तेथील दप्तरखान्यात जाऊन ऐतिहासिक कागदपत्रे चाळण्याचे त्यांना जणु वेडच लागले. त्यातून मिळणाऱ्या माहितीच्या आधारे प्रारंभी मराठी लेखन त्यांनी सुरू केले आणि १९२२ पासून पोर्तुगीज भाषेतूनही त्यांचे इतिहास विषयक लेख प्रसिद्ध होऊ लागले. परिणामी १९२६ साली त्यांना त्यांच्या आवडत्या दप्तरखान्यात साधे कारकून म्हणून प्रवेश मिळाला. त्यांचे कार्य पोर्तुगीज सरकारला पसंत पडले आणि पोर्तुगीज सरकारने १९३० साली गोव्यात 'पुरातत्त्व (आर्किआलॉजिकल) विभाग' सुरू करून त्या विभागाचे प्रमुख म्हणून डॉ. पिसुर्लेकर यांची नेमणूक केली.

त्यांनी पोर्तुगीज भाषेतून दीडशेवर ग्रंथ लिहिले. त्या मानाने त्यांचे मराठीतील लेखन पुष्कळच कमी आहे; तथापि 'पोर्तुगीज आणि मराठे' यांच्या संबंधातील अस्सल कागदपत्रे असणारे खंड त्यांनी १९२६ ते १९५७ या काळात प्रसिद्ध केले ते महाराष्ट्राचे आणि भारताचेही अभिमानस्थान ठरले आहेत. 'शिवाजीचा जन्म पोर्तुगीजांपासून झाला होता' असल्या गलिच्छ विधानांचा त्यांनी अनेक आधारांसहित समाचार घेण्याचे महत्त्वाचे कार्य केलेले आहे. पुणे विद्यापीठाच्या केळकर व्याख्यानमालेत 'पोर्तुगीज-मराठे संबंध' या विषयावर अत्यंत अभ्यासपूर्ण अशी सात पुष्पे गुंफली ती महाराष्ट्रात फारच गाजली आणि त्यामुळेच महाराष्ट्रीय जनतेला डॉ. पिसुर्लेकर यांची खरीखुरी ओळख पटली.

'गोवा हा पोर्तुगीजांच्याच मालकीचा प्रदेश आहे' हे ऐतिहासिक कागदपत्रांच्या आधारे सिद्ध करण्याची पोर्तुगीज सरकारने त्यांच्यावर सक्ती केली आणि त्यासाठी त्यांना युरोपात नेऊन ठेवले होते; पण डॉ. पिसुर्लेकर हे कोणत्याही प्रलोभनाला बळी पडले नाहीत की दंडुकेशाहीला घाबरले नाहीत. 'पोर्तुगीज सरकारच्या दाव्याला इतिहासात काहीही आधार नाही' हे त्यांनी रामशास्त्रांइतक्याच निर्भयपणे सांगितले. या त्यांच्या कामगिरीपुढे कोणाही भारतीयाने नतमस्तक झाले पाहिजे.

अशा या इतिहास-संशोधक भीष्माचार्याला ही आमची श्रद्धांजली.

—संपादक

खळबळ उडून गेली. त्या दशकातील सर्वात अधिक प्रक्षोभक लेख तोच ठरला. गीता हे महाभारताचे ठिगळ आहे असे म्हणणारे कै. प्रा. श्री. म. माटे यासारखे थोर विचारवंत गीतेच्या आणि महाभारताच्या संरक्षणास धावले. डिगरे यांची विधाने स्फोटक असली तरी ती तर्कशुद्धही होती. त्यांच्या लेखाचा परिणाम धुवून काढणे विरोधकांना अशक्य झाले. यातील खरी गंमत आणखी अशी आहे की कृष्णाचा असा उद्धार करणारे श्री. डिगरे हे अत्यंत सश्रद्ध असे कृष्णभक्त आहेत. त्यांनी कृष्णाला तळतळून अपशब्द बोललेले आहेत ते कदाचित त्या कृष्णाने जगाची व्यवस्था सुखमय करण्याचे सामर्थ्य त्याला असूनही ती दुःखमय ठेवलेली आहे म्हणून असाव्या. संत शिष्याला शिव्या देतात त्यातील हा प्रकार असावा. हा लेख 'दीपावली'तील सांस्कृतिक साहित्याचा एक श्रेष्ठ मानबिंदू आहे यात शंका नाही.

'दीपावली'चा दुसरा मानबिंदू म्हणजे महाराष्ट्राचे थोर चित्रकार श्री. द. ग. गोडसे यांची पोत ही लेखमाला. (१९६०–१९६१). कलेच्या स्वरूपात आणि आविष्कारात कालानुसार कसा फरक होत जातो ते त्यानी एका शिल्पाकृतीच्या स्वरूपात होत गेलेल्या स्वरूपाचे विश्लेषण करून स्पष्ट केले आहे. या लेखाच्या विचारातच त्यांनी व्यास आणि ज्ञानेश्वर यांची कलाकार म्हणून परखड तुलना केली आहे. त्यांचे निष्कर्ष धक्का देणारे दिसतात पण ते क्षणात पटतात. कलेच्या चिकित्सेची अनेक नवी मूल्ये या लेखमालेत अनुस्यूत झालेली झालेली आहेत. कलाकार म्हणून थोर प्रतिष्ठा पावलेला हा पुरुष चिंतनशील विचारवंत म्हणूनही तेवढ्याच थोर प्रतिष्ठेचा अधिकारी आहे. या लेखमालेची विचारघनता मूलस्पर्शी आहे याचा एक पुरावा असा की ग्रंथरूपाने ही लेखमाला प्रकाशित झाल्यावर तिचा यथोचित असा परामर्श घेण्याला फुरसत असणारे विचारवंत या विचारवंताच्या भूमीत अजून पुढे आलेले नाहीत. श्री. द. ग. गोडसे यांचाच "साहब दिल" (१९६७) हा दुसराही लेख 'दीपावली'त प्रकाशित झालेला असून त्यात त्यांनी मांडूगडावरील शिल्पकृतींच्या आधारे कलाकृती ही जातिधर्मातीत असते हा विचार कलापूर्णपणे मांडलेला आहे.

या लेखाच्या आरंभीच मी दुहेरी अडचणीचा उल्लेख केलेला आहे. त्यातील एका अडचणीचा उल्लेख तेथेच केला. दुसरी अडचण आता लिहावयाची. ती अडचण अशी की माझे स्वतःचे उदंड साहित्य 'दीपावली'त प्रसिद्ध झालेले आहे. ते सर्वस्वी याच लेखाच्या मर्यादेत बसणारे आहे. ते लोकमान्यता आणि राजमान्यता पावले हीही गोष्ट सिद्ध झालेली आहे. त्या साहित्याचा उल्लेख करणेही अडचणीचे आणि न करणेही अडचणीचे. हा लेख मी न लिहावा हाच एक मार्ग. पण दलालांनी ती सूचना नाकारली. त्यांची इच्छा मला आज्ञेप्रमाणे असल्याने मला अधिक आग्रहही धरणे अशक्य झाले. त्यामुळे माझ्याच साहित्याचा परिचय करून देण्याचे हे कार्य मी करीत आहे.

"पंडित कवींची रासक्रीडा" (१९६०) हा लेख वामनपंडित, कृष्णदयार्णव आणि मोरोपंत यांच्या काव्यातील रासक्रीडेचा परिचय करून देणारा आहे. "परि हरि हा ब्रह्मचारी" (१९६१) ही लेखमाला पूर्वोक्त लेखाची भागवताशी तुलना करणारी असून कृष्णाने पंडित कवी म्हणतात त्याप्रमाणे गोपींशी लैंगिक संबंध ठेवलेले नव्हते असे प्रतिपादन करणारी आहे. 'दीपावली'त प्रसिद्ध होणाऱ्या सांस्कृतिक चित्रमालेतील संस्कृत कवीविषयक चित्रावरील परिचयलेख माझे असून ते अमृतमेघ या ग्रंथात एकत्रित झालेले आहेत. (१९६२) "हा जय नांवाचा इतिहास आहे" (१९६२) ही लेखमाला महाभारताचा विचार करणारी आहे. महाभारताचा आदर्श युधिष्ठिर नसून कृष्ण आहे हा त्यातील प्रमुख सिद्धांत आहे. ग्रंथरूपाने प्रकाशित झाल्यावर ही लेखमाला अतिशय खळबळकारक ठरलेली आहे. या लेखमालेतील विचारांची खंडणमंडणे अजून हिरीरीने चालू आहेत. सामान्य जनात महाभारताविषयी जी जिज्ञासा आज जागृत झालेली आहे ती करणाऱ्या तीन चार ग्रंथात या लेखमालेला स्थान आहे असे म्हणणे आत्मश्लाघेचे न ठरावे. "अवतरे मी युगी युगी" (१९६३) हा लेख चीनच्या आक्रमणाच्या संदर्भात पुराणकालीन आक्रमणाचा विचार करणारा आहे. "नव वधू प्रिया मी" (१९६३) या लेखात अमरुशतकातील मुग्धा नायिकेशी संबंधित अशा श्लोकावर भाष्य असून सर्व श्लोकातून एक ललित लेख आकाराला आहे. "नवरा माझ्या मुठीत" (१९६५) हे महाभारतातील एका प्रसंगावर निरूपण आहे. "सुसंस्कृत विनोद" (१९६७) मध्ये संस्कृतातील हास्यरसाची उदाहरणे दिलेली आहेत. "कहाणी नितंबवतीची" (१९६७) याचा उल्लेख पूर्वी आलेला आहे. "पुराणातील विमानविद्या" (१९६९) मध्ये रामायण, महाभारत यातील विमानविषयक उल्लेखाचा विचार केला असून ही विमाने म्हणजे नुसती कल्पना होती असे प्रतिपादन आहे. "श्रीरामाने सीता त्याग केलाच नाही" (१९६२) हा लेख वाल्मिकी रामायणाचे उत्तरकांड हे प्रक्षिप्त आहे असे मांडणारा आहे. "वसुंधरेचे स्तन्य उधळले" (१९६३) या लेखात महत्त्वाच्या भारतीय नद्यांचे ललित वर्णन आहे. या दिवाळी अंकातील चित्रे याच लेखाशी संबंधित आहेत. "कुट्टनीमतम्" (१९६६) हा लेख याच नांवाच्या संस्कृतातील शृंगारकाव्याचा परिचय करून देणारा आहे. "सखी" (१९६८) या ललित लेखात संस्कृत साहित्यशास्त्र आणि कामशास्त्र यात आढळणाऱ्या नाइकासखीचे वर्णन केलेले आहे.

'दीपावली' माझी आहे. मी 'दीपावली'चा आहे. याचा उल्लेख मी इथे धन्यतेने करीत आहे. लेखक म्हणून माझी जी घडण आहे ती 'दीपावली'कारांनी संस्कार करून आणि

[ पृष्ठ ६५ वर ]

## 'एकांकिके'चे नाटक

# "आले देवाजीच्या मना"

'नाटयनिकेतन' ह्या नाटयसंस्थेने, तिचे समर्थ नाटककार व कुशल दिग्दर्शक श्री. मो. ग. रांगणेकर यांनी रंगभूमीच्या पडत्या काळात तिची ध्वजा सावरून धरली व आशिर्वाद, कुलवधु, रंभा, एक होता म्हातारापासून ते थेट 'तो मी नव्हेच' ह्या नाटकापर्यंत मराठी नाटयेतिहासात मोलाची भर घातली. अनेक नवे कलाकार रंगमंचाला दिले. 'भटाला दिली ओसरी' ह्या नाटकासारखे रंगतदार व प्रयोगदृष्टया रंगमंचाला नवे वाटेल असे नाटकही दिले. ह्या वाटचालीत 'नाटयनिकेतन'ने वरेरकर, अत्रे, वर्टी, दांडेकर आदि नाटककारांचे सहकार्य घेतले असले तरी प्रामुख्याने नाटयनिकेतनचा आधार होते. 'मो. ग. रांगणेकर!' आणि म्हणूनच नाटयनिकेतन व 'मो. ग. रांगणेकर' ही नावे नेहमी एकत्रच घेतली. गुंफिली जात होती. जात आहेत. परंतु गेल्या सहा वर्षात 'नाटयनिकेतन' हे नाव व्यावसायिक रंगभूमीच्या संदर्भात फारसे घेतले जात नव्हते; परंतु 'आकाशवाणी'च्या सेवेतून मुक्त झाल्यावर व 'दिग्दर्शक' म्हणून काही नाटकांच्या शिरोभागी नाव नोंदविल्यानंतर रांगणेकर आता आपले व नाटयनिकेतनचे नवे नाटक घेऊन रंगभूमीकडे वळले आहेत. गेल्याच वर्षी त्यांचा एकसष्टीनिमित्त सत्कार झाला. तरी नाटयविषयक तारुण्य व पंचविशी ते कायम राखून आहेत ही गोष्ट रांगणेकरांच्या उद्योग-प्रयत्नशीलतेची द्योतकच म्हणावी लागेल. ह्या पुनरागमनाबद्दल प्रथम रांगणेकरांचे व नाटयनिकेतनचे अभिनंदन. मराठी नाटयरसिकांनीही लेखक-दिग्दर्शक रांगणेकर व नाटयनिकेतन ही संस्था ह्यांचे जे 'सहर्ष' स्वागत केले ते मनोज्ञ वाटले. मराठी मन कृतज्ञ आहे. रसिक आहे. 'सेवा' जाणून घेण्याइतपत तत्पर आहे ही घटना शुभसूचक आहे.

नवे नाटक आहे **"आले देवाजीच्या मना"**. लेखक-दिग्दर्शक मो. ग. रांगणेकर. रांगणेकरांच्या नाटकात 'कुटुंब' व 'कौटुंबिकता' व त्यातून येणारे ताण व उत्पन्न होणारे संघर्ष यावर नेहमी भर दिलेला असतो. 'कौटुंबिक' हा शब्द तसा मर्यादित वाटला तरी अमर्याद अर्थाचा असतो. आहे. त्यामुळे संघर्षबीजे विविध रूपाची असू, लाभू शकतात. प्रस्तुत नाटकात कुणा एका कु. विद्या पंडित ह्या ध्येयवेडया मुलीच्या जीवनाची झालेली कुचंवणा व फरपट त्यानी नाटयरूपाने मांडण्याचा प्रयत्न केला आहे. विद्या पंडित हिलाही तिच्या कॉलेजजीवनात कुणीतरी प्रताप राणे भेटतो. तिचा त्याचा स्नेह जुळतो. परंतु आपल्या वडिलांच्या शिक्षणविषयक कार्याला ती वाहून घेते. त्या शाळेचा व्याप, शिस्त सांभाळण्यात ती रमून जाते. आणि तरीही 'प्रताप राणे' ह्या नावाचे तिच्या मनावर असलेले स्वामित्व ती नाकारू शकत नाही. पण त्याच्या लग्नाच्या मागणीला मात्र ती सतत ठामपणे नकारच देत राहते. तिच्या निश्चयीपणाचा जणु त्याला दरवेळी प्रत्यय देण्यासाठी निर्माण करण्यात आलेले सारे प्रसंग त्याच्या समोरच घडलेले नाटकात दाखविले आहेत. त्या साऱ्या प्रसंगात तिच्या



निश्चयी, करारी, शिस्तप्रिय आणि ध्येयवेडया वृत्तीचे प्रत्यंतर येत असले तरी 'लग्न' हे जणु तिच्या साऱ्या ध्येयवादावर निखारे ठेवण्यासाठीच होणार आहे हे जे तिने गृहित धरले आहे तेच मुळात पटण्यासारखे (कन्व्हिन्सिंग) नाही. याचे कारण जगातली (तिच्या कार्याहून महमत्त ठरलेली) कितीतरी महान कार्येही विवाहित स्त्रीपुरुषांच्या हातूनच घडलेली आहेत. ज्या महर्षी कर्व्यांचा फोटो सतत दिसत असतो त्या कर्व्यांचे, सावरकर, गांधी, आगरकर, टिळक, गोखले, शिवरामपंत परांजपे, चिपळूणकर, नेहरू, पटेलांचे आणि आजच्या कितीतरी लोकनेत्यांचे व समाजधुरीणांचे कार्य 'विवाहा'मुळे काही बंद पडले, स्थगित झाले वा संपले असे दिसत नाही. त्यातही प्रताप राणे याचे तिच्यावर प्रेम होते, तिच्या कार्यावर व निष्ठा-ध्येयवादावर त्याचीही श्रद्धा होती. कसलाच विरोध होण्याचे भय नव्हते. तो 'सैन्यात' असल्याने ती त्याच गावी राहून आपले कार्य करू शकणार होती. आणि तरीही 'हट्टी' दुराग्रहीपणाच्या टोकाला ती हा प्रश्न नेताना दिसते तेव्हा तिचे ते वागणे अतार्किक वाटते व त्यामुळे 'ध्येयवेडया' माणसांना समाजाची जी सहानुभूति मिळते तीही तिला लाभत नाही. मन मारून राहण्याची तिला गरजच नव्हती म्हणून व विशेषतः आपल्या मन मारून राहण्याचे ती जेव्हा परांजपे—गोखले प्रकरणी भांडवल करते, तेव्हा ती जी आत्यंतिक भूमिका घेते त्यामुळे तर ती सहानुभूती पारच नाहीशी होत जाते. त्यानंतर तिची होणारी फरपट मग अपरिहार्य वाटते व शेवट आधीच कळतो. तो कळल्यानंतरही नाटक जेव्हा उगाच रेंगाळत राहते तेव्हा तर ताण फारच जाणवतो. ह्या वास्तूतून ती बाहेर पडणार नाही. ते आणि तेच तिचे जग आहे हे जाणवते. वास्तविक हा विषय मला अतिशय आवडला. पण न पटण्यासारखे काही गृहित कृत्य, व्याख्यान-प्रवचनांची पुनरुक्ति, त्यातला उथळपणा, त्या भव्यतेला व उदात्ततेला आव्हान देऊ शकतील अशा घटना-प्रसंगांची उणीव यामुळे ह्या नाटकात माणसे हेलावून जात नाहीत. शेवटची नियतीची क्रूर क्रिया (क्रीडा) पहात असतानाही माणसे फारशी अस्वस्थ होत नाहीत. ह्या नाटकातल्या विद्या पंडितच्या व्यक्तिरेखेत काही अति सूक्ष्म व अति तरल असे बारकावे रांगणेकर यांनी दाखवले आहेत. त्यांची 'सूचना' ही मोठी कलात्मक पद्धतीने दिली आहे. आणि 'प्रीती'चे एक फार व्यापक, उदात्त व मनोरम रूप व्यक्त केले आहे. 'विद्या-प्रताप'च्या प्रसंगातला संयम व सहनता मला मनोज्ञ वाटली. बरे नसतानाही वाढदिवशी ती घरी परतते, बरे वाटल्यावरही 'माझं काही पत्र आलय् का ?' म्हणून पहिलाच प्रश्न करते.









अनुक्रमणिका

नाही म्हटल्यावर निराश होते. फोन आला होता कळताच हर्षित होते. निरोप जाणून घेण्यासाठी धडपडते, सहकाऱ्यांसमोर मेजर राणे थापा मारतो त्या आपल्या बचावासाठीच हे जाणून घेऊन नंतर संयमित आनंद व्यक्त करते. एका वेगळयाच स्तरावरील प्रीतीचे हे दर्शन मनाला आनंद देऊन गेले. पण गोखले-परांजपे 'लग्ना'चे भांडवल करून ती जेव्हा स्वतःच्या ध्येयवादित्वाचे व त्यागाचे गोडवे स्वतःच गाते तेव्हा मात्र ते मनाला जरा खटकते. ही ध्येयवादित्वाची, त्यागाची, अविवाहित राहण्याची सक्ति जर तिने आनंदाने स्वीकारली होती तर इतरांच्या सुफलित प्रीतीत तिने आनंद मानायला हरकत नव्हती. इतरांच्या फुलण्याने तीही फुलायला हरकत नव्हती. ती तशी फुलताना दिसली असती तर तिच्या व्यक्तित्वाला आणखी एक तेजस्वी वलय लाभले असते. आणि कधीतरी एकांतात तिला येणारे 'एकाकीपण' हे अधिक मानवी वाटले असते व तिने तिला प्रेक्षकांची सहानुभूति मिळाली असती. ह्या नाटकातले तिचे 'माईपण' (म्हणजे व मोठेपण) प्रसंगाप्रसंगातून फुलारून आल्यासारखे वाटत नाही. ते व्याख्यान-प्रवचनानी सिद्ध करण्याचा (एस्टॅब्लिश करण्याचा) प्रयत्न तोकडा पडतो. गोखले-परांजपे लग्नाचे निमित्त करून 'सर्व शिक्षक' व 'सर्व विद्यार्थिनी' जो संघर्ष निर्माण करण्याचा प्रयत्न करतात तोही असाच जुजबी, उथळ व त्यातून निघालेली उकल 'अतार्किक' वाटते. ह्या दृष्टीने हे नाटक उगाचच पसरत गेले आहे. आणि प्रवचनांच्या पुनरुक्तीमुळे काहीसे कंटाळवाणेही झाले आहे.

विषय असा असल्याने व त्यात 'रिलीफ'ला फारसा वाव नसल्याने त्याच्या निर्मितीमध्येच तो देणे अगत्याचे ठरले आहे. रांगणेकर हे कुशल दिग्दर्शक म्हणून सुकीर्त आहेत. त्याचा प्रत्यय नाट्यनिकेतनच्या पूर्वीच्या नाटकात आला तसाच तो याही नाटकात येतो. परंतु खास उल्लेख करावा लागेल तो विद्या पंडित यांची भूमिका करणाऱ्या इंदूरच्या सौ. सुमन धर्माधिकारी यांच्या कामाचा ! तीस, चाळीस व पन्नास वयाच्या ह्या भूमिकेचे वेअरिंग त्यांनी कायम राखलेच. पण वारिक सारिक हालचाली व मुद्राभिनय यामुळे त्यात सजीवता आणली. कुचंवणा, करारीपणा, शिस्तीबद्दलचा आग्रह, निश्चय आणि प्रताप राणे यांच्या नुसत्या नामोच्चाराने येणारे प्रेमाचे उमाळे आणि त्यांच्या अपघाताची वार्ता कळल्यानंतर येणारा 'ब्लँकनेस', लग्नाच्या नुसत्या कल्पनेने येणारी स्त्रीसुलभ लज्जा व कोवळीक ह्या विविध भावस्थिति त्यांनी फार समर्थपणे व्यक्त केल्या. आणि आपली जाणकार मुंबईकरांना परिचित असलेली प्रतिभा अधिक उज्ज्वल केली. बाकीचे सारे कलाकार तसे नवोदित असले तरी नवखे वाटले नाही. प्रताप राणे (विभाकर विवलकर) आपटे बाई (मंदाकिनी भडमडे) परांजपे बाई (अपर्णा तेंडुलकर) सुनंदा (लता वर्वे) ही आणखी काही जमेची चांगली नावे. विवलकर यांच्या कामातली सहजता आणि शब्द फेकण्याची पद्धत खास उल्लेखनीय वाटली. त्यांचे पहिल्या अंकातले चालणे मात्र काही वेळा ख-कले. वेष-विसंगतही वाटले. रांगणेकरांनी दिलेला 'मॅनरिझम' आवडला. 'रिलीफ' देऊन गेला. मात्र असे वाटत राहिले की, एका समर्थ 'एकांकिके'चा सुन्दर विषय फार ताणल्यामुळे त्याचे हे असे झाले.

– **चित्रगुप्त**

---

[ पृष्ठ ३७ वरून ]

महात्माजींच्या भाषणाकरता उत्सुकतेने बसला होता.ठरल्यावेळी महात्माजींचे भाषण सुरू झाले. महात्माजी हिंदीत बोलत होते. खादी, ग्रामोद्धार, स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण या विषयांवर महात्माजींचे सुमारे तासभर अस्खलित भाषण झाले. महात्माजींच्या सान्निध्यातला हा माझा तिसरा योग होय.

**पुण्यात भयानक बॉम्बस्फोट**

मी पुण्यास 'टिळक महाविद्यालयात' आयुर्वेद शाखेत शिकत असताना १९२६ साली महात्माजीना अगदी जवळून पाहण्याचा योग आला होता. पुणे महापालिकेतर्फे महात्मा गांधीना मानपत्र समर्पण करण्याचे ठरले होते. कै. ल. व. भोपटकर हे त्यावेळी पुण्याचे महापौर होते. त्यांच्या अध्यक्षतेखाली मानपत्राचा कार्यक्रम ठरला होता. महात्माजी पुण महापालिकेपाशी मोटारने उतरले. भोपटकर यांनी महात्माजींचे प्रवेशद्वारी नमस्कार करून स्वागत केले. भोपटकर महात्माजींचा उजवा हात धरून त्यांना नियोजित समारंभस्थानी नेऊ लागले तो एकाएकी भयंकर अशा बाँबचा स्फोट होऊन महात्माजींच्या अंगास बॉम्ब चाटून गेला. जिकडे तिकडे धावाधाव व गडबड गोंधळ उडाला. पण महात्माजी मात्र मुळीच डगमगले नाहीत. दोन्ही हात जोडून व जणु काही काहीच झाले नाही अशा आविर्भावात सुहास्य मुद्रेने त्यांनी श्रोत्यांना शांत होण्याचे आवाहन केले. महात्माजींच्या आवाहनास तावडतोब श्रोत्यांनी साथ दिली व यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणे लक्षावधी लोकांचा प्रचंड जनसमुदाय शांत व स्तब्ध झाला. जिकडे तिकडे शांततेचे वातावरण पसरले. मग ठरल्याप्रमाणे मानपत्राचा सर्व कार्यक्रम यथासांग पार पडला. महात्माजींनी मानपत्रास धीरगंभीर वृत्तीने उत्तर दिले व देशाच्या सद्यःस्थितीवर त्यांचे सुमारे तासभर अस्खलितपणे भाषण झाले. महात्माजींचे त्यावेळचे असामान्य धैर्य व साधुत्व पाहून जमलेल्या दोन लाख लोकांनी महात्माजींपाशी असलेल्या दिव्य तेजाचे कौतुक केल्यास नवल कसले ? मी या मानपत्राच्या समारंभास माझ्या वर्गमित्रासह हजर होतो. ल. व. भोपटकर यांनी या बाँबस्फोटाबाबत महात्माजींपाशी दिलगिरी दर्शविली व क्षमा याचना केली. सभेस जमलेल्या लाखो लोकांनी महात्माजींसारख्या ऋषितुल्य व अजातशत्रू व्यक्तीस ठार करण्याच्या नीच व अधम वृत्तीच्या व्यक्तीचा शतशः धिःकार करून श्रोतृवर्ग घरी परतला.

महात्माजींच्या १९३० सालच्या मिठाच्या सत्याग्रहात भाग घेऊन बेळगावच्या हिंडलगा जेलमध्ये ३ महिन्याची सश्रम कारावासाची शिक्षा भोगलेला मी एक त्यांचा स्वातंत्र्य सैनिक आहे. महात्मा गांधीजींच्या चिरंतन स्मृतीस अभिवादन करून मी माझ्या या आठवणीरूपी–अक्षता त्यांच्यावर उधळून कृतकृत्य होत आहे.

• • •

[ पान १० वरून–प्रचार याने.... ]

दुसऱ्या साप्ताहिकाकडे या मित्राने त्याच पत्राची कार्बन कॉपी धाडली होती. त्या पत्राच्या संपादकाने मजकूर बदलून ते पत्र प्रसिद्ध केले ! त्यास हवा असलेला मजकूर तेवढा तसाच ठेवून इतर भाग चक्क बदलून टाकला ! ह्याच साप्ताहिकाने प्रस्तुत लेखकाचे भारतातील निरनिराळ्या भागात चालणाऱ्या छुप्या व्यापारावरील तीन लेख प्रसिद्ध केले. चौथ्या कलकत्ता-काठमांडू-पीकींग ह्या Smuggling Axis वर लेख धाडला होता. "नेपाळ नरेशांना ह्या लेखाने काय वाटेल ?" असा धंदेवाईक विचार करून तो लेख ह्या संपादकांनी प्रसिद्धच केला नाही. एकदा पुण्यास ह्या दिल्लीवासीय संपादकांची गाठ पडली. " You know our difficulties ", असे सांगून संपादकसाहेबांनी माझी चक्क माफी मागितली. लोकशाहीतील राजकारणात "त्याला काय वाटेल ?" ही समस्या मोठी गुंतागुंतीची असते. अशा वेळी "चूप मरो" हे धोरणच फायदेशीर ठरते.

मला गंमत वाटते ती तथाकथित विद्वान लोकांची. बिचारे पाठीचा कणा मोडून जुन्या वर्तमानपत्रांच्या फायली चाळतात, सारा मजकूर लिहून काढतात, त्यावर संशोधन करतात, पाहिजे असेल तेवढा मजकूर वापरतात व आपल्याला अनुकूल नसेल तेवढा मजकूर नेमका दुर्लक्षून आपला ४००–५०० पानी प्रबंध प्रसिद्ध करतात ! आपल्याला अनुकूल असलेल्या पुढाऱ्यांना भेटून हे विद्वान मजकूर जमवितात व मोठमोठ्या पुढाऱ्यांची अवतरणे आत टाकून आपल्या प्रबंधास भारदस्तपणा आणतात. बिचाऱ्यांना काय माहीत की प्रत्येक राजकीय घटनेस दोन बाजू, दोन 'आँखों देखा हाल' लिहिणारे वार्ताहर व दोन जातीचे वाचक लाभलेले असतात ! ह्या 'आँखों देखा हाल'वर आधारित असंख्य चरित्रे, आत्मचरित्रे व प्रबंध दरवर्षी जन्मास येतात. दुर्दैवाने ह्या साऱ्या वाङ्मयात सत्य किती व खोटे किती हे फक्त परमेश्वरालाच माहीत ! परमेश्वरास असंख्य चक्षू आहेत म्हणून बरे आहे. जर तो चुकून वार्ताहरांवर विसंबून राहू लागला तर विश्वाचा संसार आटोपलाच म्हणून समजा !

गुजरात समाचार, संदेश, मुंबई समाचार व जनसत्ता ही सारी प्रतिष्ठित गुजराती वृत्तपत्रे मुंबईत जरा काही दंगा झाला की या गुजराती धनिकांच्या पत्रांना भीती वाटते, "चटणा लोंको आपणने अहमदावाद मोकळी आपसे." श्री. बाळ ठाकरे यांची 'शिवसेना' जन्मास येते न येते तोच ह्या गुजराती वृत्तपत्रांनी ठाकरे यांना एकदम प्रसिद्धी देऊन "मोठे बनविले." फक्त दाक्षिणात्यांविरुद्ध शिवसेनेचा रोख आहे एवढे कळल्यावर ही गुर्जर पत्रे एकदम थंड पडली. हे निरीक्षण बाळ ठाकरे यांना मी सांगत असताना त्यांना त्यावेळी फार मौज वाटली. त्याच्या पुढची पायरी म्हणजे 'करंट'च्या कराकांनी बाळ ठाकरे यांची "शिवसेना बोलत आहे" ही लेखमाला प्रसिद्ध केली ! नुकत्याच झालेल्या मुंबईतील दंगलीचा गंमत म्हणून 'आँखो देखा हाल' तामीळ, तेलगू, इंग्रजी, गुजराती व मराठी वृत्तपत्रातून जमवून मी मित्रांच्या मदतीने वाचून काढला व फुकटात स्वतःची खूपच करमणूक करवून घेतली. काही तामीळ वार्ताहरांनी तर मुंबईत प्रलय सुरू झाले, मुंबईत आता रशियन क्रांतीप्रमाणे काहीतरी मोठी गडबड घडून येणार असे वर्णन केले होते. बाळ ठाकरे यांच्या समर्थकांनी "हा सारा गोंधळ मद्रासी गुंडांनी घातला, आमचा त्याच्याशी काहीही संबंध नाही" असा मोठा परिणामकारक युक्तीवाद करून ठाकरे यांची बाजू मोठ्या प्रभावीपणाने पुढे मांडली.

[ उत्तरार्ध पुढील अंकी ]

---

[ पृष्ठा ६२ वरून ]

प्रोत्साहन देऊन घडविलेली आहे. ममत्वाचा जो जिव्हाळा आहे त्याचा उल्लेख ऋणाच्या भाषेत होऊच शकणार नाही.

'दीपावली'त एका महत्वाच्या अंगाचा आढावा घेण्याची संपादकांची आज्ञा, आज्ञापालन म्हणून मी पाळलेली आहे. माझे पितामहही शोभतील अशा गुरुजनांच्या लेखांचा आढावा मी इथे घेतलेला आहे. हा आढावा घेण्याचा अधिकार मला आहे असा मला भ्रम नाही. 'दीपावली' सतत वाचनात आहे, तिच्या स्मरणावर आणि आयत्या वेळी घाईघाईत शक्य ते संदर्भ पाहून मी ही सेवा केलेली आहे. अगदी थोडे जुने अंक पहावयासही मिळालेले नाहीत. कुठे अनवधानाही झाले असणे शक्य आहे. त्यामुळे इथे एखादे गैरविधान झाले असेल अथवा अधिक उणा शब्द पडला असेल तर संबधितांनी मला क्षमा करावी अशी विनंती आहे. कुणाचाही जाणून अधिक्षेप करावा अशी माझी धारणा नाही.

हा लेख लिहिण्याची संधी मला मिळाली ती एका अर्थी आनंदपर्वणीही ठरली. ते ते जुने स्मरले गेले. चित्रे तर सारी पुन्हा पाहिली गेली. हा आनंद केवळ उपभोगल्यानेच कळणारा. तो दिल्याबद्दल धन्यवाद! मी सान्त आहे. 'दीपावली' अनंत असो. ही अंती प्रार्थना!

● ● ●



अनुक्रमणिका




## एकापेक्षा एक सरस

स. न. वि. वि.

'दीपावली'च्या रजत-महोत्सवी वर्षात आपण विशेषांकांची मालिकाच प्रसिद्ध करीत आहात म्हणून कुतुहलाने प्रत्येक अंक साक्षेपी दृष्टीने वाचत आहे. मार्च आणि मे हे दोन्ही अंक सरस वाटले. त्यात अग्रक्रम कुणाला द्यावा हे सांगणे कठीण आहे.

मेच्या वायुसेनादल विशेषांकात श्री. आनंद साधले यांनी 'पुराणातील विमान-विद्ये'ची माहिती अभ्यासपूर्वक जमविलेली दिसते. त्यांची प्रारंभीची 'मरुत् स्तुती'ही आवडली. सौ. विजया ओबेरॉय यांनी आपल्या पहिल्या उड्डाणातील अनुभव सांगितले आहेत त्यांनी मजा वाटली. विशेषत: Kiss Me च्या पट्टीचा किस्सा तर फारच गंमतीचा आहे. इतर माहितीपूर्ण लेखांमुळे जडत्व आलेल्या या अंकात सौ. ओबेरॉय आणि श्री. प्रभाकर पेंढारकर यांच्या मजकुराने आवश्यक तो रिलीफ मिळाला आहे. श्री. राजा बढे यांची 'वारांगना' तर अत्युत्तम आहेच पण कवितेच्या शीर्षकात केलेली 'वाराऽऽ अंगना' ही फोड अत्यंत मार्मिक आहे. श्री. अशोक मोटे यांच्या 'प्रहरी' या भावकथेचाही मुद्दाम उल्लेख केला पाहिजे. या अंकातील 'उडते विनोद' ही व्यंगचित्रेही अंकाच्या विषयाशी सुसंगत असल्यामुळे अंकाच्या सरसपणात भरच पडली आहे.

'दीपावली'च्या प्रारंभापासूनच्या कामगिरीचा आढावा घेणाऱ्या लेखांचा संकल्प आपण जाहीर केला आहे, त्यातील श्री. भय्यासाहेब ओंकार यांचा 'दीपावलीचे चित्रांगण' हा पहिला लेख मनोज्ञ आहे.

'दीपावली'चे यापुढील विशेषांकही एकापेक्षा एक सरस असे निघोत हीच आम्हा वाचकांची सदिच्छा !

**शहापूर,** आपला
**जि. ठाणे** **रंगनाथ रेगे**

## तीन दिवस झोप नाही

स. न. वि. वि.

अगदीच राहवेना म्हणून हे पत्र लिहीत आहे. एप्रिलच्या 'दीपावली'तील 'आई' ही गोष्ट वाचून तीन दिवस झोप लागली नाही. मन अस्वस्थ झाले. कशाला लिहितात अशा गोष्टी ! आपल्या लेखकांवर काहीच रिस्पॉन्सिबिलिटी नाही का ? आजकालच्या समाजात असे प्रकार होत असतात का ? अद्यापि १९२०-३०च्याच काळात आपण आहोत ? असल्या इमॅजिनरी कमकुवतपणाचे प्रदर्शन करण्याचे कारण काय ?

एक मुलगी – वयात आलेली – आजच्या समाजात वावरणारी, एका मुलाबरोबर आपल्या आयुष्याचे क्षण घालवीत आहे. आईची गोष्ट तिला समजत असली तरी त्या परिस्थितीतून आपल्या आईला बाहेर काढण्यासाठी ती स्वार्थत्याग करील, पण कोणता ? जो स्वार्थत्याग लेखिका दाखवीत आहे तो स्वार्थत्याग आहे का ? तो फक्त मनाचा कमकुवतपणा—नाही—एक प्रकारचा दडलेला स्वार्थच दाखवतो. काही धडपड न करता आजच्या काळात वाढलेली मुलगी, जिला एक विचारी मुलगी म्हणून दाखविण्याचा लेखक प्रयत्न करीत आहे, ती काहीही धडपड न करता एका क्षणात अत्यंत ओंगळ असे आयुष्य पत्करील का ? नाही, नक्कीच नाही. ती आपल्या आईला घेऊन बाहेर पडेल, आपल्या मित्राकडून मदत मिळवील, मदत नाही मिळाली तर काहीना काही खटपट करून पोट भरण्याचा प्रयत्न करील—अखेरीस स्वतंत्र धंदासुद्धा करील. परंतु लेखिका दाखवीत आहे त्याप्रमाणे ओंगळ कृत्य कधीच करणार नाही. फक्त, मी वर लिहिल्याप्रमाणे जर ती मनान कमकुवत असेल व स्वार्थासाठी थोडीशीसुद्धा धडपड करणार नसेल तरच ! पण अशा मुली क्वचितच आढळतील.

आजच्या लेखकांनी आपल्या तरुण पिढीला अजमावलेच नाही व हेच दुर्भाग्य ! आजची तरुण पिढी अत्यंत स्वतंत्र व स्वाभिमानी आहे. अशा प्रकारच्या गोष्टी लिहून आपला कमकुवतपणा मात्र दाखवितात—मनाचा नि विचारांचा ।

आपला
**दांडेली** **मेजर बी. नाडकर्णी**







अनुक्रमणिका

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment AUGUST 1969

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.